# श्रीहरिभजनामृत.



भाग २ रा. 





संग्राहक

रा. जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर

प्रकाशक

क्षीरसागर आणि कंपनी.



किंमत १२ आणे.

# प्रकाशकांचे दोन शब्द.



आज चार वर्षें आम्ही बुकसेलरचा धंदा करीत आहों. त्यामुळें महाराष्ट्रांतील लोक नाटकें कादंबऱ्यांचेच भोक्ते नसून चांगलें वाङ्मयही त्यांस आवडतें असें आढळून आल्यावरून आमचे मित्र व प्रसिद्ध महाराष्ट्र-कवि-चरित्रकार रा. रा. जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर यांजकडून श्रीहरिभजनामृत नांवाच्या पुस्तकाचे तीन भाग तयार करून घेतले. रा. आजगांवकर हे या विषयांत किती पारंगत आहेत हें त्यांना वेळोवेळीं मिळालेल्या बक्षिसांवरून वाचकांस माहीत आहेच. सध्यांचे दिवसांत अशा प्रकारचीं पुस्तकें प्रसिद्ध करणें किती दुरापास्त झालें आहे हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. या पुस्तकास जर चांगला लोकाश्रय मिळाला तर अशा प्रकारचीं पुस्तकें विद्वान् मंडळीकडून तयार करवून तीं आश्रयदात्यांस अगदीं स्वल्प किंमतींत देण्यांत येतील. चांगल्या प्रकारच्या वाङ्मयाचा महाराष्ट्र समाजांत प्रसार करणें हें आम्ही आमच्या उद्योगाचें मुख्य ध्येय ठरविलें आहे व तदनुसार आमचे प्रयत्नही चालू आहेत. या प्रयत्नास यश येणें हें मुख्यतः महाराष्ट्रांतील गुणज्ञ व रसिक जनाच्या सक्रिय सहानुभूतीवर अवलंबून असून ही सहानुभूती आम्हांस भरपूर मिळेल अशी आमची खात्री आहे.

मुंबई २२-८-१८.

क्षीरसागर आणि मंडळी.



# प्रस्तावना



महाराष्ट्र-कवि-चरित्र-लेखनाचा उद्योग करीत असतां गेल्या दहावीस वर्षांत बहुतेक सगळ्या जुन्या मराठी कवींची उपलब्ध कविता मला चाळावी लागली. त्या वेळीं ठिकठिकाणीं अशीं कांहीं सुंदर पद्यें माझ्या अवलोकनांत आलीं कीं त्यांतील प्रसाद, प्रेमळपणा, अर्थगांभीर्य, भाषासौंदर्य, काव्यप्राचुर्य इत्यादि गुणसमुच्चयाच्या निदर्शनानें मी अगदीं वेडावून गेलों. व पुढें मागें त्या सर्व रमणीय पद्यपुष्पांची एक तीन पदरी सुंदर माला गुंफून ती प्रेमळ व रसिक जनास अर्पण करावी असाही विचार मनांत आला. परंतु अनुकूल परिस्थितीच्या अभावीं हा विचार कृतींत उतरविण्याचें काम बरेच दिवस लांबणीवर पडलें होतें. शेवटीं, गेल्या वर्षी या ग्रंथाचा पहिला भाग मोठ्या प्रयासानें छापून प्रसिद्ध केला. छपाईचें काम मनासारखें झालें नसतांही, काढलेल्या सर्व प्रति अवघ्या चार महिन्यांत खपून गेल्या. रसिक विद्वानांनीं व वर्तमानपत्रकर्त्यांनीं ग्रंथांतील पद्यांच्या निवडीविषयीं अनुकूल अभिप्राय व्यक्त केले त्यामुळें उत्तेजन येऊन ग्रंथाचे पुढील दोन्ही भाग मी लवकरच लिहून काढले. परंतु छपाईस लागणाऱ्या द्रव्याच्या अभावीं " उत्पद्यंते विलीयन्ते दरिद्राणां मनोरथाः " अशी स्थिति होते कीं काय या विचारांत, मुंबईतील बहुतेक ग्रंथप्रकाशकांस, ग्रंथ छापून प्रसिद्ध करण्याविषयीं विनंति केली असतां, हल्लीं ...सदाच्या भयंकर महागाईंत, हें मोठ्या खर्चाचें व धाडसाचें काम अंगावर ...याचें धैर्य एकाच्याही अंगीं दिसेना. बहुतेकांची प्रवृत्ति कादंबऱ्या नाटकां...च विशेष दिसली. परंतु " सत्य संकल्पाचा दाता भगवान " या संत...चनाप्रमाणें, माझे मित्र रा. माधवराव रघुनाथ क्षीरसागर, क्षीरसागर आणि ...पनीचे उत्साही मालक यांनीं, माझ्या श्रमाचा योग्य मोबदला मला आगाऊ ...ऊन हें पुस्तक प्रसिद्ध करण्याचें काम हातीं घेतलें व त्याप्रमाणें सदर ग्रंथाचे

तीन्ही भाग सुबक रीतीनें छापून प्रेमळ हरिभक्तांस आज ते प्रेमानें सादर करीत आहेत. पहिल्या भागाच्या प्रथमावृत्तीस महाराष्ट्रांतील रसिकांनीं जसा उदार आश्रय दिला तसाच या तीन्ही भागांस ते देतील अशी प्रकाशकांप्रमाणेंच माझीही खात्री आहे.

प्रस्तुत ग्रंथाच्या पहिल्या भागांत बहुतेक सर्व जुन्या मराठी कवींचीं अगदीं निवडक व अत्यंत प्रेमळ अशीं एकंदर २५२ पदें दिलीं आहेत. दुसऱ्या भागांत उत्तर हिंदुस्थानांतील सूरदास, तुलसीदास, नानक, कबीर, मीराबाई वगैरे बहुतेक सर्व जुन्या कवींचीं सुमारें ३२५ निवडक पदें दिलीं आहेत; व तिसऱ्या भागांत महाराष्ट्रांतील सर्व संतकवींचे ४७९ निवडक अभंग दिले आहेत. हीं पद्यें किती सरस आहेत हें त्यांच्या प्रत्यक्षावलोकनानें वाचकांच्या निदर्शनास येण्याजोगें असल्यामुळें त्यासंबंधानें येथें विशेष कांहीं लिहिण्याची आवश्यकता आहे असें वाटत नाहीं; तथापि नुसती भाविकपणाची दृष्टि सोडून केवळ काव्यदृष्टीनें पाहणाऱ्या रसिकांसही हा पदसंग्रह अगदीं तल्लीन करून सोडील अशी माझी खात्री आहे. शेवटीं रा. क्षीरसागर यांचे पुनः एकवार आभार मानून ही प्रस्तावना पूर्ण करितों.

ज. र. आजगांवकर.

मुंबई. ता. २५।७।१८

# अनुक्रमणिका

## ग



## घ



## च

[ समाप्त ]

# श्रीहरिभजनामृत



## भाग ३ रा.

### अभंग १.

समचरणदृष्टि विटेवरी साजिरी । तेथें माझी हरी वृत्ति राहो ॥१॥
ाणिक नलगे मायिक पदार्थ । तेथें माझें आर्त नको देवा ॥ २ ॥
ह्मादिक पदें दुःखाची शिराणी । तेथें दुश्चित झणीं जडों देसी ॥३॥
ुका ह्मणे त्याचें कळलें आह्मां वर्म । जे जे कर्म धर्म नाशवंत ॥४॥

### २.

नये जरी तुज मधुर उत्तर । दिधला सुस्वर नाहीं देवें ॥ १ ॥
ाहीं तयावीण भुकेला विठ्ठल । येइल तैसा बोल रामकृष्ण ॥ २ ॥
वापाशीं मागें आवडीची भक्ति । विश्वासेंशीं प्रीति भावबळें ॥ ३ ॥
का म्हणे मना सांगतों विचार । धरावा निर्धार दिसेंदिस ॥ ४ ॥

### ३.

अंतरींची घेतो गोडी । पाहे जोडी भावाची ॥ १ ॥ देव सोयरा
व सोयरा । देव सोयरा दीनांचा ॥२॥ आपुल्याच वैभवें । शृंगारावें
ळें ॥ ३ ॥ तुका म्हणे जेवीं सवें । प्रेम द्यावें प्रीतीचें ॥ ४ ॥

### ४.

ुढें गेले त्यांचा शोधीत मारग । चला जाऊं माग घेत आह्मी ॥१॥
चरणरज सेवूं उष्टावळी । पूर्वे कर्मो होळी करूनियां ॥ २ ॥

अमूप हें गांठीं बांधूं मांडवल । अनाथा विठ्ठल आम्हां जोगा ॥ ३ ॥
अवघे होती लाभ एका या चिंतनें । नामसंकीर्तनें गोविंदाच्या ॥४॥
जन्ममरणाच्या खुंटतील खेपा । होईल हा सोपा सिद्ध पंथ ॥ ५ ॥
तुका ह्मणे घालूं जीवपणा चिरा । जाऊं त्या माहेरा निजाचिया॥६॥

५.

देवाच्या प्रसादें करा रे भोजन । व्हाल कोण कोण अधिकारी ते ॥ १ ॥ ब्रह्मादिकांसी हें दुर्लभ उच्छिष्ट । नका मानूं वीट ब्रह्मरसीं ॥ २ ॥ अवघियांपुरतें वोसंडलें पात्र । अधिकार सर्वत्र आहे येथें ॥ ३ ॥ इच्छादानी येथें वोळला समर्थ । अवघेंचि आर्त्त पुरवितो ॥४॥ सरे येथें ऐसें नाहीं कदाकाळीं । पुढती वाटे कवळीं घ्यावें ऐसें ॥ ५ ॥ तुका म्हणे पाक लक्षुमीच्या हातें । कामारी सांगातें निरुपम ॥ ६ ॥

६.

सुंदर तें ध्यान उभें विटेवरी । कर कटावरी ठेवूनियां ॥ १ ॥
गळां तुळसीहार कांसे पीतांबर । आवडे निरंतर हेंचि ध्यान ॥ २ ॥
मकर कुंडलें तळपती श्रवणीं । कंठीं कौस्तुभमणि विराजित ॥ ३ ॥
तुका म्हणे माझें हेंचि सर्व सुख । पाहीन श्रीमुख आवडीनें ॥ ४ ॥

७.

सदा माझे डोळां जडो तुझी मूर्ती । रखुमाईच्या पती सोयरिया॥१
गोड तुझें रूप गोड तुझें नाम । देईं मज प्रेम सर्व काळ ॥ २
विठो माउलिये हाचि वर देईं । संचरोनि राहीं हृदयामाजी ॥ ३
तुका म्हणे कांहीं न मागे आणिक । तुझे पायीं सुख सर्व आहे ॥४।

८.

राजस सुकुमार मदनाचा पुतळा । रविशशिकळा लोपलिया ॥१॥
कस्तूरी मळवट चंदनाची उटी । रुळे माळ कंठीं वैजयंती ॥ २ ॥
मुगुट कुंडलें श्रीमुख शोभलें । सुखाचें ओतिलें सकळही ॥ ३ ॥
कांसे सोनसळा पांघरे पाटोळा । घननीळ सांवळा बाईयांनों ॥ ४ ॥
सकळही तुह्मी व्हा गे एकीसवा । तुका म्हणे जीवा धीर नाहीं ॥५॥

९.

कर कटावरी तुळसीच्या माळा । ऐसें रूप डोळां दावीं हरी ॥१॥
ठेविले चरण दोन्ही विटेवरी । ऐसें रूप हरी दावीं डोळां ॥ २ ॥
कटीं पीतांबर कास मिरवली । दाखवीं वहिली ऐसी मूर्ती ॥ ३ ॥
गरुडपारावरी उभा राहिलासी । आठवे मानसीं तेंचि रूप ॥ ४ ॥
झुरोनि पांझरा होऊं पाहें आतां । येईं पंढरीनाथा भेटावया ॥ ५ ॥
तुका म्हणे माझी पुरवावी आस । विनंति उदास करूं नये ॥ ६ ॥

१०.

विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म । भेदाभेद भ्रम अमंगळ ॥ १ ॥
आइका जी तुह्मी भक्त भागवत । कराल तें हित सत्य करा ॥ २ ॥
कोणाही जीवाचा न घडावा मत्सर । वर्म सर्वेश्वर पूजनाचें ॥ ३ ॥
तुका म्हणे एका देहाचे अवयव । सुख दुःख जीव भोग पावे ॥४॥

११.

आलिंगन घडे । मोक्ष सायुज्यता जोडे ॥ १ ॥ ऐसा संतांचा
जाली बोलायाची सीमा ॥ २ ॥ तीर्थें पर्वकाळ । अवघीं
सकळ ॥३॥ तुका म्हणे देवा । त्यांची केली पावे सेवा ॥४॥

## १२.

मज दास करी त्याचा । संतदासाच्या दासाचा ॥ १ ॥ मग होत कल्पवरी । सुखें गर्भवास हरी ॥ २ ॥ नीच वृत्ति काम । परि मुखीं तुझें नाम ॥३॥ तुका म्हणे सेवे । माझे संकल्प वेंचावे ॥४॥

## १३.

पराविया नारी माउलीसमान । मानिलिया धन काय वेंचे ॥ १ ॥ न करितां परनिंदा परद्रव्य अभिळास । काय तुमचें यास वेंचे सांगा ॥ २ ॥ बैसलिये ठायीं म्हणतां राम राम । काय होय श्रम ऐसें सांगा ॥ ३ ॥ संतांचे वचनीं मानितां विश्वास । काय तुमचे यास वेंचे सांगा ॥ ४ ॥ खरें बोलतां कोण लागती सायास । काय वेंचे यास ऐसें सांगा ॥ ५ ॥ तुका म्हणे देव जोडे याच साठीं आणिक ते आटी न लगे कांहीं ॥ ६ ॥

## १४.

शुद्ध बीजापोटीं । फळें रसाळ गोमटीं ॥ १ ॥ मुखीं अमृताच वाणी । देह देवाचे कारणीं ॥ २ ॥ सर्वांग निर्मळ । चित्त जैं गंगाजळ ॥ ३ तुका म्हणे जाती । ताप दर्शनें विश्रांती ॥ ४ ॥

## १५.

करावी ते पूजा मनेंचि उत्तम । लौकिकाचें काम काय असे कळावें तयासी कळे अंतरींचें । कारण तें साचें साच अंगीं ॥ अतिशयाअंतीं लाभ किंवा घात । फळ देतें चित्त बीजा ऐसें ॥ तुका ह्मणे जेणें राहे समाधान । ऐसें तें भजन पार पावी ॥ ४

१६.

न ये नेत्रां जळ । नाहीं अंतरीं कळवळ ॥१॥ तों हे चावटीचे बोल । जन रंजवणें फोल ॥ २ ॥ न फळे उत्तर । नाहीं स्वामी जों सादर ॥ ३ ॥ तुका ह्मणे भेटी । जंव नाहीं दृष्टादृष्टी ॥ ४ ॥

१७.

सुख पाहतां जवापाडें । दुःख पर्वताएवढें ॥ १ ॥ धरीं धरीं आठवण । मानीं संतांचें वचन ॥ २ ॥ नेलें रात्रीनें तें अर्ध । बाळपण जरा व्याध ॥३॥ तुका म्हणे पुढा । घाणा जुंपीजसी मूढा ॥४॥

१८.

संसाराच्या तापें तापलों मी देवा । करितां या सेवा कुटुंबाची ॥१॥ म्हणऊनि तुझे आठविले पाय । ये वो माझे माय पांडुरंगे ॥ २ ॥ बहुतां जन्मींचा झालों भारवाही । सुटिजे हें नाहीं वर्म ठावें ॥ ३ ॥ वेढियेलों चोरीं अंतर्बाह्यात्कारीं । कणव न करी कोणी माझी ॥ ४ ॥ बहु पांगविलों बहु नागविलों । बहु दीस झालों कासावीस ॥ ५ ॥ तुका ह्मणे आतां धांव घालीं वेगीं । ब्रीद तुझें जगीं दीनानाथा ॥६॥

१९.

युक्ताहार न लगे आणिक साधनें । अल्प नारायणें दाखवीलें ॥१॥ कलियुगामाजी करावें कीर्तन । तेणें नारायण देईल भेटी ॥ २ ॥ . लौकीक सांडावा वेव्हार । घ्यावें वनांतर भस्म दंड ॥ ३ ॥ तुका म्हणे मज आणिक उपाव । दिसती न वाव नामेंवीण ॥ ४ ॥

२०.

गौळियाचीं ताकपीरें । कोण पोरें चांगलीं ॥ १ ॥ येवढा त्यांचा देवा । काय सेवा भक्ती ते ॥ २ ॥ काय उपास पडिले होते ।

कण्या भोंवते विदुराच्या ॥ ३ ॥ तुका ह्मणे कुब्जा दासी । रूपरासी हीनकळा ॥ ४ ॥

## २१.

आतां तरी पुढें हाचि उपदेश । नका करूं नाश आयुष्याचा ॥१॥
सकळांच्या पायां माझें दंडवत । आपुलालें चित्त शुद्ध करा ॥ २ ॥
हित तें करावें देवाचें चिंतन । करूनियां मन एकविध ॥ ३ ॥
तुका म्हणे लाभ होय तो व्यापार । करा काय फार शिकवावें ॥४॥

## २२.

जेणें घडे नारायणीं अंतराय । होत बाप माय वर्जावीं तीं ॥ १ ॥
येर प्रिया पुत्र धना कोण लेखा । करिती तीं दुःखा पात्र शत्रू ॥२॥
प्रल्हादें जनक बिभीषणें बंधु । राज्य माता निंदु भरतें केली ॥ ३ ॥
तुका म्हणे सर्व धर्म हरिचे पाय । आणिक उपाय दुःखमूळ ॥४॥

## २३.

न करीं रे संग राहें रे निश्चळ । लागों नेदीं मळ ममतेचा ॥१॥
या नांव अद्वैत खरें ब्रह्मज्ञान । अनुभवावीण बडबड ते ॥ २
इंद्रियांचा जय वासनेचा क्षय । संकल्पाहीन ये वरी मन ॥ ३
तुका म्हणे न ये जाणीव अंतरा । अंतरीं या धारा आनंदाचा ॥४॥

## २४.

शुकसनकादिकीं उभारिला बाहो । परीक्षिती लाहो दिसां सातां ।
उठाउठीं करी स्मरणाचा धांवा । धरवत देवा नाहीं धीर ॥
त्वरा जाली गरुडा टाकियलें मागें । द्रौपदीच्या लागें नारायणें
तुका म्हणे करी बहुत तांतडी । प्रेमाची आवडी लोभा पूर ॥

२५.

आतां केशीराजा हेचिं विनवणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥१॥ देह असो माझा भलतिये ठायीं । चित्त तुझ्या पायीं असों द्यावें ॥२॥ काळाचें खंडण घडावें चिंतन । तनमनधन विन्मुखता ॥ ३ ॥ कफ वातपित्त देहअवसानीं । ठेवावीं वारूनि दुरितें हीं ॥ ४ ॥ सावध तों माझीं इंद्रियें सकळ । दिली एक वेळ हांक आधीं ॥५॥ तुका म्हणे तूं या सकळांचा जनिता । येथें ऐक्यता सकळांसी ॥ ६ ॥

२६.

ऐसा हा लौकिक कदा राखवेना । पतितपावना देवराया ॥ १ ॥ संसार करितां म्हणती हा दोषी । टाकितां आळसी पोटपोसा ॥ २ ॥ आचार करितां ह्मणती हा पसारा । न करितां नरा निंदितातीं ॥३॥ संतसंग करितां म्हणती हा उपदेशी । येरा अभाग्यासी ज्ञान नाहीं ॥४॥ धन नाहीं त्यासी ठायींचा करंटा । समर्थासी ताठा करिताती ॥५॥ बहु बोलों जातां म्हणती हा वाचाळ । न बोलतां सकळ म्हणती गर्वी ॥ ६ ॥ भेटिसि नव जातां म्हणती हा निष्ठुर । येतां जातां घर बुडविलें ॥ ७ ॥ लग्न करूं जातां म्हणती हा मातला । न करितां जाला नपुंसक ॥८॥ निपुत्रिका ह्मणतीं पहा हो चांडाळ । पातकाचें मळ पोरवडा ॥ ९ ॥ लोक जैसा ओक धरितां धरवेना । अभक्ता ग संतसंग ॥ १० ॥ तुका म्हणे आतां आइका वचन । नियां जन भक्ति करा ॥ ११ ॥

२७.

ते माझे सोयरे सज्जन सांगाती । पाय आठविती विठोबाचे ॥१॥ मान विधिपाळपुरणातें । देवाचीं तीं भूतें ह्मणोनियां ॥ २ ॥

सर्वभावें जालों वैष्णवांचा दास। करीन त्यांची आस उच्छिष्टाची॥३॥ तुका म्हणे जैसे आवडती हरिदास। तैसी नाहीं आस आणिकांची ॥४॥

२८.

कन्या सासुऱ्यासी जाये । मागें परतोनि पाहे ॥ १ ॥ तैसें झालें माझ्या जीवा । कधीं भेटसी केशवा ॥ २ ॥ चुकलिया माय । बाळा हुरूहुरू पाहे ॥ ३ ॥ जीवनावेगळी मासोळी । तैसा **तुका** तळमळी ॥ ४ ॥

२९.

आणिकाची स्तुति आम्हां ब्रह्महत्या। एकावांचुनि त्या पांडुरंगा ॥१॥ आम्हां विष्णुदासां एकविध भाव। न म्हणों या देव आणिकासी॥२॥ शतखंड माझी होईल रसना । जरी या वचना पालटेन ॥३॥ **तुका** म्हणे मज आणिका संकल्पें । अवघींच पापें घडतील ॥ ४ ॥

३०.

केली सीताशुद्धि । मूळ रामायणा आधीं ॥ १ ॥ ऐसा प्रतापी गहन । सकळ भक्तांचें भूषण ॥२॥ जाऊनी पाताळा । केली देवींची अवकळा ॥ ३ ॥ राम लक्षुमण । नेले आणिले चोरून ॥ ४ ॥ जोडुनियां कर । उभा सन्मुख समोर ॥ ५ ॥ **तुका** म्हणे जपें । वायुसुता जाती पापें ॥ ६ ॥

३१.

काय उणें आम्हां विठोबाचे पायीं। नाहीं ऐसें काई येणें एक॥१॥ तें हें भोंवतालें ठायीं वांटूं मन । बराडी करून दारोदारीं ॥२॥ कोण बळी माझ्या विठोबावेगळा। आणिक आगळा दुजा सांगा॥३॥ तुका म्हणे मोक्ष विठोबाचे गांवीं। फुकाचीं लुटावीं भांडारें तीं

## ३२.

सेवितों हा रस वांटितों आणिकां । घ्या रे होऊं नका रानभरी ॥१॥ विटेवरी ज्याचीं पाउलें समान । तोचि एक दानशूर दाता ॥ २ ॥ मनाचे संकल्प पाववील सिद्धी । जरी राहे बुद्धि याचे पायीं ॥ ३ ॥ तुका म्हणे मज धाडिलें निरोपा । मारग हा सोपा सुखरूप ॥ ४ ॥

## ३३.

जे कां रंजले गांजले । त्यांसि म्हणे जो आपुले ॥ १ ॥ तोचि साधु ओळखावा । देव तेथेंचि जाणावा ॥ २ ॥ मृदु सबाह्य नवनीत । तैसें सज्जनाचें चित्त ॥ ३ ॥ ज्यासि आपंगिता नाहीं । त्यासि धरी जो हृदयीं ॥ ४ ॥ दया करणें जे पुत्रासी । तेचि दासा आणि दासी ॥५॥ तुका म्हणे सांगूं किती । तोचि भगवंताची मूर्ती ॥६॥

## ३४.

विठ्ठल सोयरा सज्जन विसांवा । जाइन त्याच्या गांवा भेटावया ॥१॥ सांणभाग त्यासि सांगेन आपुला । तो माझा बापुला सर्व जाणे॥२॥ माय माउलिया बंधुवर्ग जाणा । भाकीन करुणा सकळिकांसी ॥३॥ संत महंत सिद्ध महनुभाव मुनि । जीवभाव जाउनी सांगेन त्यां ॥४॥ माझिये माहेरीं सुखा काय उणें । नलगे येणें जाणें तुका म्हणे ॥५॥

## ३५.

ध्याइन तुझें रूप गाइन तुझें नाम । आन न करी काम जिव्हा ॥ १ ॥ पाहिन तुझे पाय ठेवीन मी डोई । पृथक तें कांहीं न [illegible]न ॥ २ ॥ तुझेनि गुणवाद आइकेन कानीं । आणिकांची [illegible] आतां ॥३॥ करिन सेवा करें चालेन मी पायीं । आणिक

न वजे ठायीं तुजविण ॥ ४ ॥ तुका म्हणे जीव ठेवीन मी पायीं आणीक तें कांहीं देऊं कवणा ॥ ५ ॥

## ३६.

माझें चित्त तुझे पायीं । राहे ऐसें करीं कांहीं । धरोनियां नाहीं भव हा तारीं दातारा ॥ १ ॥ चतुरा तूं शिरोमणि । गुणलावण्याची खाणी । मुगुट सकळां मणि । धन्य तूंचि विठोबा ॥२॥ करीं तिमिरांचा नाश । उदयो होऊनि प्रकाश । तोडीं आशापाश । करीं वास हृदयीं ॥ ३ ॥ पाहें गुंतलों नेणतां । माझी असो तुम्हां चिंता तुका ठेवी माथां । पायीं आतां राखावें ॥ ४ ॥

## ३७.

आमुचें उचित हेचि उपकार । आपुलाचि भार घालूं तुज ॥१ भूक लागलीया भोजनाची आळी । पांघुरण काळीं शीताचिये॥ २ जेणें काळीं उठी मनाची आवडी । तेंचि मागों घडी आवडे तें॥३ दुःख येवों नेदी आमचिया घरा । चक्र करी फेरा भोंवताला ॥४ तुका म्हणे नाहीं मुक्तीसवें चाड । हेंचि आम्हां गोड जन्म घेतां॥५

## ३८.

कृष्ण माझी माता कृष्ण माझा पिता । बहिणी बंधु चुलता कृष्ण माझा ॥ १ ॥ कृष्ण माझा गुरु कृष्ण माझा तारूं । उतरी पैं भवनदीचा ॥ २ ॥ कृष्ण माझें मन कृष्ण माझें जन । सज्जन कृष्ण माझा ॥ ३ ॥ तुका म्हणे माझा श्रीकृष्ण विसावा वाटे न करावा परता जीवा ॥ ४ ॥

## ३९.

कास घालोनि बळकट । झालों कळिकाळावरी नीट । केली पायवाट । भवसिंधुवरूनि ॥१॥ या रे या रे लहान थोर । याति भलती नारी नर । करावा विचार । नलगे चिंता कोणासी ॥ २ ॥ कामीं गुंतले रिकामे । जपी तपी येथें जमे । लाविले दमामे । मुक्त आणि मुमुक्षा ॥ ३ ॥ एकंदर शिक्का । पाठविला येही लोका । आलों ह्मणे तुका । मी नामाचा धारक ॥ ४ ॥

## ४०.

आम्ही वैकुंठवासी । आलों याचि कारणासी । बोलिले जे ऋषि । साच भावें वर्ताया ॥ १ ॥ झाडूं संतांचे मारग । आडरानें भरलें जग । उच्छिष्टाचा भाग । शेष उरला तो सेवूं ॥ २ ॥ अर्थे लोपलीं पुराणें । नाश केला शब्दज्ञानें । विषय लोभें मन । साधन हें बुडविलें ॥ ३ ॥ पिटूं भक्तीचा डांगोरा । कळीकाळासी दरारा । तुका म्हणे करा । जयजयकार आनंद ॥ ४ ॥

## ४१.

पढियें तें आम्ही तुजपाशीं मागावें । जीवींचें सांगावें हितगूज ॥१॥
रशील लळे दीन वो वत्सले । विठ्ठले कृपाळे जननीये ॥ २ ॥
व तुझ्या ठेवियेला पायीं । तूंचि सर्वांठायीं एक आम्हां ॥३॥
गचा संग लागों नेदीं वारा । नाहीं जात घरा आणिकांच्या ॥४॥
स॑ एकी आहे तुजपाशीं । ठावें आहे देसी मागेन तें ॥५॥
गवुनि॑ं मांडियेली आळी । र्थकोनियां चोळी डोळे तुका ॥६॥

४२.

नलगे हें मज तुझें ब्रह्मज्ञान । गोजिरें सगुण रूप पुरे ॥ १ ॥
लागला उशीर पतितपावना । विसरोनि वचना गेलासि या ॥ २ ॥
जाळोनि संसार बैसलों अंगणीं । तुझे नाहीं मनी मानसीं हें ॥३॥
तुका म्हणे नको रागेजुं विठ्ठला । उठीं देईं मला भेटी आतां ॥४॥

४३.

देखोनियां तुझा सगुण आकार । उभा कटीं कर ठेवूनियां ॥१॥
तेणें माझ्या चित्ता जालें समाधान । वाटतें चरण न सोडावे ॥२॥
मुखें गातों गीत वाजवितों टाळी । नाचतों राउळीं प्रेमसुखें ॥३॥
तुका म्हणे केलें तुझ्या नामापुढें । तुच्छ हें बापुडें सकळही ॥४॥

४४.

न मिळो खावया न वाढो संतान । परि हा नारायण कृपा करो ॥१॥
ऐसी माझी वाचा मज उपदेशी । आणिक लोकांसी हेंचि सांगें ॥२॥
विटंबो शरीर होत कां विपत्ती । परी राहो चित्तीं नारायण ॥३॥
तुका म्हणे नाशिवंत हें सकळ । आठवी गोपाळ तेंचि हित ॥४॥

४५.

कां रे माझा तुज नये कळवळा । असोनि जवळा हृदयस्था ॥१॥
अगा नारायणा निष्ठुरा निर्गुणा । केला शोक नेणां कंठस्फोट ॥२॥
कां हें चित्त नाहीं पावत विश्रांति । इंद्रियांची गति खुंटेचि न
तुका म्हणे कांहो धरियेला कोप । सरलें नेणों पाप पांडुरंगा

४६.

दीनानाथा तुझीं ब्रीदें चराचर । घेसिल कैवार शरणागता
पुराणीं जे तुझे गर्जती पवाडे । तें आम्हां रोकडें कळों आलें

आपुल्या दासाचें न साहासी उणें । उभा त्या कारणें राहिलासी ॥३॥
चक्र गदा हातीं आयुधें अपार । न्यून तेथें पुरें करूं धांवें ॥ ४ ॥
तुका म्हणे तुज भक्तींचें कारण । करावया पूर्ण अवतार ॥ ५ ॥

४७.

वर्णूं महिमा ऐसी नाहीं मज वाचा । न बोलवे साचा पार तुझा ॥१॥
ठायींची ही काया ठेविली चरणीं । आतां ओंवाळुनि काय सांडूं ॥२॥
नाहीं भाव ऐसा करूं तुझी सेवा । जीव वाहूं देवा तोही तुझा ॥ ॥
मज माझें कांहीं न दिसे पाहतां । जें तुज अनंता समर्पावें ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां नाहीं मज थार । तुझे उपकार फेडावया ॥ ५ ॥

४८.

नाहीं सुख मज नलगे हा मान । न राहे हे जन काय करूं ॥१॥
देह उपचारें पोळतसे अंग । विषातुल्य चांग मिष्टान्न तें ॥ २ ॥
नाइकवे स्तुती वाणितां थोरीव । होतो माझा जीव कासावीस ॥३॥
तुज पावें ऐसी सांग कांहीं कळा । नको मृगजळा गोवूं मज ॥४॥
तुका म्हणे आतां करीं माझें हित । काढावें जळत आगींतुनी ॥५॥

४९.

भीत नाहीं आतां आपुल्या मरणा । दुःख होतें जनां न देखवे ॥१॥
आमची तो जाती ऐसी परंपरा । कां तुम्ही दातारा नेणां ऐसी ॥२॥
[illegible]ल चतुर येथें न पवती । करितील रितीं तर्क मतें ॥ ३ ॥
णे केणें जालें एके घरीं । मज आणि हरी तुम्हां गांठी ॥४॥

५०.

विण वाणीं आणिकांची थोरी । तरी माझी हरी जिव्हा झडो ॥१॥
। चित्ता आवडे आणीक । तरी हा मस्तक भंगो माझा ॥२॥

नेत्रीं आणिकासी पाहीन आवडी । जातु तेचि घडी चांडाळ हे ॥३॥ कथामृतपान न करितां श्रवण । काय प्रयोजन मग यांचें ॥ ४ ॥ तुका म्हणे काय वांचून कारण । तुज एक क्षण विसंबतां ॥ ५ ॥

५१.

आम्हासाठीं अवतार । मत्स्यकूर्मादि सूकर ॥ १ ॥ मोहें धांव घाली पान्हा । नांव घेतां पंढरीराणा ॥२॥ कोठें न दिसे पाहतां । उडी घाली अवचिता ॥३॥ सुख ठेवी आम्हासाठीं । दुःख आपणची घोंटी ॥ ४ ॥ आम्हां घाली पाठीकडे । आपण कळिकाळाशीं भिडे ॥ ५ ॥ तुका ह्मणे कृपानिधी । आह्मां उतरी नावेमधीं ॥६॥

५२.

नाम साराचेंही सार । शरणागत यमकिंकर ॥ १ ॥ उत्तमा उत्तम । वाचे बोला पुरुषोत्तम ॥ २ ॥ नाम जपतां चंद्रमौळी । नामें तरला वाल्हा कोळी ॥ ३ ॥ तुका ह्मणे वर्णूं काय । तारक विठोबाचे पाय ॥ ४ ॥

५३.

त्रैलोक्या पाळितां उबगला नाहीं । आमुचें त्या काई असेल ओझें ॥ १ ॥ पाषाणाचे पोटीं बैसला दर्दुर । तया मुखीं चार कोण घाली ॥ २ ॥ पक्षी अजगर न करी संचित । तयासी अनंत प्रतिपाळी ॥ ३ ॥ तुका ह्मणे तया भार घातलिया । उपेक्षी दयासिंधु माझा ॥ ४ ॥

५४.

मी तों दीनाहुनि दीन । माझा तुज अभिमान ॥ १ ॥ आलों शरणागत । माझें करावें स्वहित ॥ २ ॥ दीनानाथा कृपा

भाळावें आपुल्या नांवा ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां । भलें नव्हे कळितां ॥ ४ ॥

९९.

सोळीव जें सुख अति सुखाहुनी । उभें तें अंगणीं वैष्णवांच्या ॥१॥ ावन सडे चौक रंगमाळा । नाचतो सोहोळा देखोनियां ॥ २ ॥ षणमंडित सदा सर्व काळ । मुद्रा आणि माळ तुळसी कंठीं ॥ ३ ॥ ामबोध मुखीं अमृताचें सार । मस्तक पवित्र सहित रजें ॥ ४ ॥ का म्हणे मोक्ष भक्तांचिया मना । नये हे वासना त्यांची करी॥ ५ ॥

९६.

कोणतें कारण राहिलें यामुळें । जें म्या तुज बळें कष्टवावें ॥ १ ॥ नाहीं जात जीव होत नाहीं हानी । सहज तें मनीं आठवलें ॥२॥ नाहीं कांहीं चिंता मरत उपवासी । अथवा त्या म्हैसी गाई व्हाव्या ॥३ ॥ हें तों तुज कळों येतसे अंतरीं । लापणिक वरी साच भाव ॥ ४ ॥ तुका म्हणे देवा नाशिवंतासाठीं । पायांसवें तुटी करिती तुझ्या ॥ ५ ॥

९७.

तुज वर्णी ऐसा तुजविण नाहीं । दुजा कोणी तिहीं त्रिभुवनीं ॥ १ ॥ सहस्रमुखें शेष सिणला बापुडा । चिरलिया धडा जिव्हा त्याच्या ॥ २ ॥ अव्यक्ता अलक्षा अपारा आनंदा । निर्गुणा सच्चिदानंदा नारायणा ॥ ३ ॥ रूप नाम घेसी आपुल्या स्वइच्छा । होसी भाव तैसा त्याकारणें ॥ ४ ॥ का म्हणे जरी दाविसी आपणा । तरिच नारायणा कळों येसी ॥५॥

९८.

पूर आला आनंदाचा । लाटा उसळती प्रेमाच्या ॥ १ ॥ बांधूं ळ सांगडी । पोहुनि जाऊं पैल थडी ॥ २ ॥ अवघे जन गडी ।

घाला उडी भाईनो ॥ ३ ॥ हें तों नाहीं सर्व काळ । अमूप आनंदाचें जळ ॥ ३ ॥ तुका म्हणे थोरा पुण्यें । ओघ आला पंथें येणें ॥ ४ ॥

५९.

आतां मी अनन्य येथें अधिकारी । होइन कोणे परी नेणों देवा ॥ १ ॥ पुराणीचा अर्थ आणितां मनास । होय कासावीस जीव माझा ॥ २ ॥ इंद्रियांचीं आह्मीं पांगिलों अंकित । त्यांचे रंगीं चित्त रंगलेंसे ॥ ३ ॥ येकाचेंही मज न घडे दमन । अवघीं नेमून कैसीं राखों ॥ ४ ॥ तुका म्हणे जरी मोकलिसी आतां । तरी मी अनंता वायां गेलों ॥ ५ ॥

६०.

कैसें करूं ध्यान कैसा पाहों तुज । वर्म दावीं मज याचकासी ॥ १ ॥ कैसी भक्ती करूं सांग तुझी सेवा । कोण्या भावें देवा आतुडसी ॥ २ ॥ कैसी कीर्ति वाणूं कैसा लक्षा आणूं । जाणूं हा कवणू कैसा तूज ॥ ३ ॥ कैसा गाऊं गीतीं कैसा ध्याऊं चित्तीं । कैसी स्थिती मती दावीं मज ॥ ४ ॥ तुका म्हणे जैसें दास केलें देवा । तैसें हें अनुभवा आणीं मज ॥ ५ ॥

६१.

नामपाठ मुक्ताफळांच्या वोवणी । हें सुख सगुणीं अभिनव ॥ १ ॥ तरी आम्ही जालों उदास निर्गुण । भक्तांचिया मना मोक्ष नये ॥ २ ॥ द्यावें घ्यावें ऐसा येथें उरे भाव । जाय ठाया ठाव पुसोनियां ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां अभयदान करा । ह्मणा विश्वंभरा दिलें ऐसें ॥ ४ ॥

६२.

बैसूं खेळूं जेवूं । तेथें नाम तुझें गाऊं ॥ १ ॥ रामकृष्ण नाम-माळा । घालुं ओवुनियां गळां ॥ २ ॥ विश्वास हा धरूं । नाम बळकट करूं ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां । आह्मां जीवन शरणागतां ॥ ४ ॥

६३.

जाणे भक्तीचा जिव्हाळा । तोचि देवाचा पुतळा ॥ १ ॥ आणिक न ये माझ्या मना । हो का पंडित शाहाणा ॥ २ ॥ नामरूपीं जडलें चित्त । त्याचा दास मी अंकित ॥ ३ ॥ तुका ह्मणे नवविध । भक्ति जाणें तोचि शुद्ध ॥ ४ ॥

६४.

वंदीन मी भूतें । आतां अवघींचि समस्तें ॥ १ ॥ तुमची करीन भावना । पदोपदीं नारायणा ॥ २ ॥ गाळुनियां भेद । प्रमाण तो ऐसा वेद ॥ ३ ॥ तुका म्हणे मग । नव्हे दुजियाचा संग ॥ ४ ॥

६५.

कृपावंत किती । दीन बहु आवडती ॥ १ ॥ त्यांचा भार वाहे माथां । करी योगक्षेमचिंता ॥ २ ॥ भुलों नेदी वाट । करीं धरूनि दावी नीट ॥ ३ ॥ तुका म्हणे जीवें । अनुसरल्या एक भावें ॥४॥

६६.

घेईं घेईं माझे वाचे । गोड नाम विठोबाचें ॥ १ ॥ तुह्मी घ्या रे डोळे सुख । पाहा विठोबाचें मुख ॥ २ ॥ तुह्मी आइका रे कान । माझ्या विठोबाचे गुण ॥ ३ ॥ मना तेथें धांव घेईं । राहें विठोबाचे पायीं ॥ तुका म्हणे जीवा । नको सोडूं या केशवा ॥ ५ ॥

## ६७.

तुझा शरणागत । जन्मोजन्मींचा अंकित ॥ १ ॥ आणिक नेणें कांहीं हेवा । तुजवांचुनि केशवा ॥ २ ॥ हेंचि माझें गाणें । तुझें नामसंकीर्तन ॥ ३ ॥ तुझ्या नामाचीं भूषणें । तुका म्हणे ल्यालों लेणें ॥ ४ ॥

## ६८.

आयुष्य गेलें वायांवीण। थोर झाली नागवण ॥१॥ आतां धांवा धांव करीं । काय पाहातोसि हरी ॥ २ ॥ माझें तुझें याचि गती दिवस गेले तोंडीं माती ॥ ३ ॥ मन वाव घेऊं नेदी । बुडवूं पाहे भवनदी ॥४॥ पाडिला विषयाचा घाला । तेणें नागविलें मला ॥५॥ शरण आलों आतां धांवें । तुका म्हणे मज पावें ॥ ६ ॥

## ६९.

हांकेसरिसी उडी । घालूनियां स्तंभ फोडी ॥ १ ॥ ऐसी कृपावंत कोण । माझे विठाईवांचून ॥ २ ॥ करितां आठव । धांवोनियां घाल कव ॥ ३ ॥ तुका म्हणे गीतीं गातां । नामें द्यावी सायुज्यता ॥४

## ७०.

तुझा दास मज म्हणती अंकित। अववे सकळिक लहान थोर॥१ हेंचि आतां लागे करावें जतन । तुझें थोरपण तुज देवा ॥ २ होऊनि निर्भर राहिलों निश्चित । पावन पतित नाम तुझें ॥ ३ करितां तुज होय डोंगराची राई । न लागतां कांहीं पात्या पातें ॥४ तुका म्हणे तुज काय तें अशक्य । तारितां मशक मज दीना ॥५

## ७१.

भक्तवत्सल दीनानाथ । तिहीं लोकीं ज्याची मात ।। १ ।। तो हा पुंडलिकासाठीं । आला उभा वाळवंटीं ।। २ ।। गर्भवास धरी । अंबऋषीचा कैवारी ।। ३ ।। सकळां देवां अधिष्ठान । एका मंत्रासी कारण ।। ३ ।। तुका म्हणे ध्यानीं । ज्यासी ध्यातो शूळपाणी ।।५।।

## ७२.

जेणें तुज झालें रूप आणि नांव । पतित हें दैव तुझें आम्ही ।।१।। नाहीं तरी तूज कोण हो पुसतें । निराकारी तेथें एकएकीं ।। २ ।। अंधारें तें दीपा आणियेली शोभा । माणिकासी प्रभा कोंदणाची।।३।। धन्वंतरी रोगें आणिला उजेडा । सुखी काय चाडा जाणावें त्या।।४।। अमृतासी मोल विषाचिया गुणें । पितळ तरी सोनें उंच नीच ।। ५ ।। तुका म्हणे आम्हीं असोनियां जाण । तुज देवपण आणियेलें ।।६।।

## ७३.

मायबापापुढें लेंकराची आळी । आणिक हे पाळी कोण लळे।।१।। सांभाळा जी माझीं विषमें अनंता । जवळीं असतां अव्हेरूं कां ।।२।। आणिकांची चाले सत्ता आह्मांवरी । तुमची ते थोरी काय मग ।।३।। तुका म्हणे आलों दुरोनि जवळी । आतां टाळाटाळी करूं नये ।।४।।

## ७४.

नाचे टाळी पिटी । प्रेमें अंग धरणीं लोटी ।। १ ।। माझे सखे ते सज्जन । भोळे भाविक हरिजन ।। २ ।। न धरिती लाज । नाहीं जनासवें काज ।। ३ ।। तुका म्हणे दाटे । कंठ नेत्रीं जळ लोटे ।।४।।

७५.

वाटुली पाहातां सिणले डोळुले । दाविसीं पाउलें कैं वो डोळां ॥१॥
तूं माय माउली कृपेची साउली । विठ्ठले पाहिली वास तुझी ॥ २ ॥
कां बा मोकलिलें कोणा निरविलें । कठिण कैसें झालें हृदय तुझें॥३॥
तुका ह्मणे माझ्या आसावल्या बाह्या । तुज क्षेम द्याया पांडुरंगा ॥४॥

७६.

मनवाचातीत तुझें हें स्वरूप । ह्मणोनियां माप भक्ति केलें॥१॥
भक्तिचिया मापें मोजितों अनंता । इतरानें तत्वतां न मोजवे ॥ २ ॥
योगयागतपें देहाचिया योगें । ज्ञानाचिया लागें न सांपडसी ॥ ३ ॥
तुका ह्मणे आम्ही भोळ्या भावें सेवा । घ्यावी जी केशवा करितों ऐसी ॥ ४ ॥

७७.

नाम आठवीतां सद्गदित कंठीं । प्रेम वाढे पोटीं ऐसें करीं ॥१॥
रोमांच जीवन आनंदाश्रु नेत्रीं । अष्टांगही गात्रीं प्रेम तुझें ॥ २ ॥
सर्वही शरीर वेचों ह्या कीर्तनीं । गाऊं निशिदिनीं नाम तुझें ॥ ३ ॥
तुका ह्मणे दुजें न करीं कल्पांतीं । सर्वदा विश्रांति संतांपायीं ॥ ४ ॥

७८.

मैंद आला पंढरीस । हातीं घेउनि प्रेमपाश ॥ १ ॥ पुढें नाडियलें जग । नेतो लागों नेदी माग ॥ २ ॥ उभारोनि बाहे । दृष्टादृष्टि वेधिताहे ॥ ३ ॥ वैकुंठीहुनि पेणें । केलें पंढरीकारणें ॥ ४ ॥ पुंडलीकें थारा । देउनि आणिलें या चोरा ॥ ५ ॥ तुका म्हणे चला । तुह्मी आम्ही धरूं त्याला ॥ ६ ॥

७९.

धांव घालीं आई । आतां पाहतीस काई ॥ १ ॥ धीर नाहीं माझे पोटीं । जालों वियोगें हिंपुटी ॥ २ ॥ करावें सीतळ । बहु जाली हळहळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे डोई । कईं ठेवीन हे पायीं ॥४॥

८०.

आतां गावूं तुज ओविया मंगळीं । करूं गदारोळी हरिकथा॥१॥
होसी निवारिता आमुचें सकळ । भय तळमळ पाप पुण्य ॥ २ ॥
भोगिले ते भोग लावूं तुझे अंगीं । अलिप्त या जगीं होउनि राहूं॥३॥
तुका ह्मणे आम्ही लाडिकीं लेंकरें । न राहों अंतरें पायांवीण ॥ ४ ॥

८१.

म्हणवितों दास ते नाहीं करणी । आंत वरी दोन्ही भिन्न भाव॥१॥
गातों नाचतों तें दाखवितों जना । प्रेम नारायणा नाहीं अंगीं ॥२॥
पाविजे तें वर्म न कळेचि कांहीं । बुडालों या डोहीं दंभाचिया ॥३॥
भांडवल काळें हातोहातीं नेलें । माप या लागलें आयुष्यासी ॥ ४ ॥
तुका म्हणे वांया गेलों ऐसा दिसे । होईल या हांसें लौकिकाचें॥५॥

८२.

स्त्रीपुत्रादिकीं राहिला आदर । विषयीं पडिभर अतिशय ॥ १ ॥
आतां सोडवणें धांव नारायणा । मज हे वासना अनावर ॥ २ ॥
येउनियां आड ठाके लोकलाज । तों हें दिसे काज अंतरलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे आम्हां जेथें तेथें गोंवा । तेथें तुझी देवा सांभाळावें॥४॥

८३.

उचित जाणावें मुख्य धर्म आधीं । चित्त शुद्ध बुद्धि ठायीं थर ॥ १ ॥ न घालावी धांव मनाचिये ओढीं । वचनीं आवडी

संतांचिये ॥ २ ॥ अंतरीं या राहे वचनाचा विश्वास । नलगे उपदेश तुका ह्मणे ॥ ३ ॥

## ८४.

काय उणें झालें तुज समर्थासी । ऐसा मजपाशीं कोण दोष ॥१॥ जो तूं माझा न करिसी अंगीकार । सांगेन वेव्हार संतांमधीं ॥ २ ॥ तुजविण रत आणिकाचे ठायीं । ऐसें कोण ग्वाही दावीं मज ॥ ३ ॥ तुका म्हणे काय धरुनी गुमान । सांग उगवून पांडुरंगा ॥ ४ ॥

## ८५.

काय कृपेवीण घालावें सांकडें । निश्चिंती निवाडें कोण्या एका॥१॥ आहों तैसीं पुढें असों दीनपणें । वेंचुनि वचनें करुणेचीं ॥२॥ धरुनि भय आतां काय वाहों चिंता । काय करूं आतां आतपण ॥ ३ ॥ तुका ह्मणे आम्ही भावहीन जीव । म्हणवुनी देव दुरे दूर ॥ ४ ॥

## ८६.

काय आम्ही आतां पोटचि भरावें । जग चाळवावें भक्त म्हूण॥१॥ ऐसा तरी एक सांगा जी विचार । बहु होतें फार कासावीस ॥ २ ॥ काय कवित्वाची घालूनियां रूढी । करूं जोडाजोडी अक्षरांची ॥३॥ तुका ह्मणे काय गुंफोनि दुकाना । राहों नारायणा करुनी घात ॥४॥

## ८७.

काळ सारावा चिंतनें । एकांतवासी गंगास्नानें । देवाचे पूजनें । प्रदक्षणा तुळसीच्या ॥ १ ॥ युक्त आहारविहार । नेम इंद्रियांसी सार । नसावी बासर । निद्रा बहु भाषण ॥ २ ॥ परमार्थ महा धन । जोडीं देवाचे चरण । व्हावया जतन । हे उपाय लाभाचे ॥ ३ ॥

देह समर्पिजे देवा । भार कांहींच न घ्यावा । होईल आघवा । तुका म्हणे आनंद ॥ ४ ॥

८८.

विष्णुमय सर्व वैष्णवांसी ठावें । येरांनीं वहावे भार माथां ॥ १ ॥ साधन संकट सर्वांलागीं शीण । व्हावा लागे क्षीण अहंभाव ॥ २ ॥ भाव हा कठिण वज्र हें भेदवे । परि न छेदवे मायाजाळ ॥ ३ ॥ तुका म्हणे वर्म भजनेंचि सांपडे । येरासी तों पडे वोस दिशा ॥४॥

८९,

आतां आम्हां हेंचि काम । वाचे गाऊं तुझें नाम । वाहुनियां टाळी प्रेम । सुखें आनंदें नाचावें ॥ १ ॥ अवघी झाली आराणूक । मागें पुढें सकळिक । त्रिपुटींचें दुःख । प्रारब्ध सारिलें ॥ २ ॥ गोदा-तटें निर्मळें । देवघेवांचीं देऊळें । संत महंत मेळें । दिवस जाय सुखाचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे पंढरिनाथा । आणिक नाहीं मज चिंता । योगक्षेम माथां । भार तुझ्या घातला ॥ ४ ॥

९०.

अखंड जया तुझी प्रीति । मज दे तयाची संगति । मग मी कम-ळापति । तुज बा नाणीं कांटाळा ॥ १ ॥ पडोन राहेन तये ठायीं । गाचि संतांचिये पायीं । न मागें न करीं कांहीं । तुझी आण गा ठोवा ॥ २ ॥ तुह्मी आम्ही पीडों जेणें । दोन्ही वारती एकानें । पलों धरणें । हाका देत दाराशीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे या बोला । त्त द्यावें बा विठ्ठला । न पाहिजे केला । अवघा माझा अव्हेर ॥ ४ ॥

## ९१.

आम्ही पतितांनीं घालावें सांकडें । तुम्हा लागे कोडें उगवणें॥१॥ आचरतां दोष न धरूं सांभाळ । निवाड उकल तुम्हां हातीं ॥ २ ॥ न घेतां कवडी करावा कुढावा । पाचारितां देवा नामासाठीं ॥ ३ ॥ दयासिंधु नाम पतितपावन । हें आम्हां वचन सांपडलें ॥ ४ ॥ **तुका** म्हणे करूं अन्यायाच्या कोटी । कृपावंत पोटीं तुम्ही देवा॥५॥

## ९२.

माझी विठ्ठल माउली । प्रेमपान्हा पान्हाइली ॥ १ ॥ कुर्वाळुनि लावी स्तनीं । न वजे दुरी जवळूनी ॥ २ ॥ केली पुरवी आळी । नव्हे निष्ठुर कोंवळी ॥ ३ ॥ **तुका** म्हणे घांस । मुखीं घाली ब्रह्मरस ॥ ४ ॥

## ९३.

कृपाळू म्हणोनी बोलती पुराणें । निर्धार वचनें याचीं मज ॥१॥ आणीक उपाय नेणेंचि मी कांहीं । तुझें वर्म ठायीं पडे तैसें ॥ २ ॥ नये धड कांहीं बोलतां वचन । रिघालों शरण सर्व भावें ॥ ३ ॥ कृपा करिसी तरी थोडें तुज काम । माझा तरि श्रम बहु हरे ॥ ४ ॥ **तुका** म्हणे मज दाखवीं श्रीमुख । हरेल या भूक डोळियांची ॥५॥

## ९४.

दोन्ही हात ठेवुनि कटीं । उभा भीवरेच्या तटीं । कामूजनें साठीं । भक्तिकाजें विठ्ठला ॥ १ ॥ भागलासी मायबापा । इंद्रियांसी केल्या खेपा । आम्हालागीं सोपा । दैत्यां काळ कृतांत ॥हा धन। होतासी क्षीरसागरीं । मही दाटली असुरीं । म्हणोनि ॥ ३ ।

गौळियाचे अवतार ॥ ३ ॥ केला पुंडलिकें गोवा । तुज पंढरीसि देवा । तुका ह्मणे भावा । साठीं हातीं सांपडसी ॥ ४ ॥

९५.

गोड जालें पोट धालें । अवचिता वाचे आलें । म्हणतां पाप गेलें । विठ्ठलसें वाचेसी ॥ १ ॥ सत्य मना रे सकळ । उद्धरिला अजामेळ । महापातकी चांडाळ । नामासाठीं आपुलिया ॥ २ ॥ चित्त पावलें आनंदा । सुखसमाधीतें सदा । म्हणतां गोविंदा । वेळोवेळां वाचेसी ॥३॥ हें जाणती अनुभवी । जया चाड तो चोजवी । तुका ह्मणे दावी । रूप तेंचि अरूप ॥ ४ ॥

९६.

हरि हरि तुम्हीं ह्मणा रे सकळ । तेणें मायाजाळ तुडईल ॥१॥
आणिक नका कांहीं गाबाळाचे भरीं । पडों येते थोरी नागवण॥२॥
भावें तुळसीदळ पाणी जोडा हात । ह्मणावें पतित वेळोवेळां ॥३॥
तुका ह्मणे हा तंव कृपेचा सागर । नामासाठीं पार पाववील ॥४॥

९७.

शीतळ साउली आमुची माउली । विठाई वोळली प्रेमपान्हा॥१॥
जाउनि वोसंगा रिघेन वोरस । लागेल तें इच्छे पिईनवरी ॥ २ ॥
मा तनु माझी सांभाळी दुमोनि । अमृतसंजीवनी लोटलीसे ॥३॥
आंदाचा ठाव नाहीं माझे चित्तीं । सागर तो किती उपमेसी ॥४॥
जीजाय पडे तयेसी सांकडें । सांभाळीत पुढें मागें असे ॥ ५ ॥
आम्हणे चिंता कैसी ते मी नेणें । लडिवाळ तान्हें विठाईचें॥६॥

९८.

आम्हीं गावें तुम्हीं कोणीं कांहीं न ह्मणावें । ऐसें तंव आम्हां सांगितलें नाहीं देवें ॥ १ ॥ म्हणा रामराम टाळी वाजवा हातें । नाचा डोला प्रेमें आपुलिया स्वहितें ॥ २ ॥ सहज घडे तया आळस करणें तें काई । अग्नीचें भातुकें हात पाळितां कां पायीं ॥ ३ ॥ येथें नाहीं लाज भक्तिभाव लौकिक । हांसे तया घडे ब्रह्महत्या पातक ॥४॥ जया जैसा भाव निरोपण करावा । येथें नाहीं चाड ताल विताळ या देवा ॥ ५ ॥ सदैव ज्या कथाकाळीं घडे श्रवण । तुका ह्मणे येर जन्मा आले ते पाषण ॥ ६ ॥

९९.

जळो माझी ऐसी बुद्धी । मज घाली तुज मधीं । आवडी हे विधी । निषेधींच चांगली ॥ १ ॥ तूं स्वामी मी सेवक । उंच पद नीच एक । ऐसें करावें कौतुक । नको करूं खंडणा ॥ २ ॥ जळ न खाती जळा । वृक्ष आपुलिया फळा । भोक्ता तो निराळा । तेणें गोडी निवडिली ॥ ३ ॥ हिरा शोभला कोंदणें । अळंकारीं मिरवे सोनें । एक असतां तेणें । काय दुजें जाणावें ॥ ४ ॥ उष्णें छायें सुख वाटे । बाळें मातें पान्हा फुटे । एका एक भेटे । भोगा सुख ते काळीं ॥ ५ ॥ तुका म्हणे हित । हेंचि मानी माझें चित्त । नव्हे आतां मुक्त । ऐसा जाला भरवंसा ॥ ६ ॥

१००

हाचि परमानंद आलंगीन बाहीं । क्षेम देतां ठायीं द्वैत तुटे ॥सी बोलायासी मात निवे हर्षे चित्त । दुणी वाढे प्रीत प्रेमसुख ॥ मन । जनांत भूषण वैकुंठीं सरता । फावलें स्वहिता सर्वभावें ॥ ३ ॥

तुटला वेव्हार माया लोकाचार । समूळ संसार पारुषला ॥ ४ ॥
तुका म्हणे तो हा विठ्ठलचि व्हावा । आणिक या जीवा चाड
नाहीं ॥ ५ ॥

१०१.

पाहतां श्रीमुख सुखावलें सुख । डोळियांची भूक नवजे माझ्या ॥१॥
जिव्हे गोड तीन अक्षरांचा रस । अमृत जयास फिकें पुढें ॥ २ ॥
श्रवणाची वाट चोखाळली शुद्ध । गेले भेदाभेद निवारोनी ॥ ३ ॥
महामळें मन होतें जें गादलें । शुद्ध चोखाळलें स्फटिक जैसें ॥ ४ ॥
तुका ह्मणे माझ्या जीवाचें जीवन । विठ्ठल निधान सांपडलें ॥ ५ ॥

१०२

तुज ऐसा कोण उदाराची रासी । आपुलेंचि देसी पद दासा ॥१॥
शुद्ध हीन कांहीं न पाहासी कुळ । करिसी निर्मळ वास देहीं ॥ २ ॥
भावें हें कदान्न खासी त्याचे घरीं । अभक्ताच्या परी नावडती ॥३॥
नवसाजी जेथें दुरी दवडितां । न येसी जो चित्ता योगीयांच्या ॥४॥
तुका म्हणे ऐसीं ब्रीदें तुझीं खरीं । बोलतील चारी वेदु मुखें ॥ ५ ॥

१०३.

सर्व विशीं माझा त्रासलासे जीव । आतां कोण भाव निवडूं
एक ॥ १ ॥ संसाराची मज न साहेचि वार्ता । आणीक म्हणतां
माझें कोणी ॥ २ ॥ देहसुख कांहीं बोलिलें उपचार । विष तें
आदर बंध वाटे ॥ ३ ॥ उपाधि द्राटणी प्रतिष्ठा गौरव । होय माझा
जीव कासावीस ॥ ४ ॥ तुका म्हणे कांहीं आणीक न साहे ।
आवडती पाय वैष्णवाचे ॥ ५ ॥

१०४.

माझ्या विठोबाचा कैसा प्रेमभाव । आपणचि देव होय गुरु ॥१॥
पढियें देहभाव पुरवी वासना । अंतीं तें आपणापाशीं न्यावें ॥२॥
मागें पुढें उभा राहे सांभाळीत । आलिया आघात निवारावे ॥३॥
योगक्षेम त्याचें जाणे जडभारी । वाटे दावी करीं धरूनियां ॥४॥
तुका म्हणे नाहीं विश्वास ज्या मनीं । पाहावें पुराणीं विचारूनी ॥५॥

१०५.

जेथें वैष्णवाचा वास । धन्य भूमि पुण्यदेश ॥ १ ॥ दोष नाहीं ओखदासी । दूत सांगे यमापाशीं ॥ २ ॥ गरुडटकयांच्या भारें । भूमि गर्जे जयजयकारें ॥ ३ ॥ सहज तया अना छंद । वाचे गोविंद गोविंद ॥ ४ ॥ तुळसीवनें रंगमाळा । अवघा वैकुंठ सोहळा ॥ ५ ॥ तुका म्हणे भेणें । काळ नये तेणें रानें ॥ ६ ॥

१०६.

काय ते विरक्ति न कळेचि आम्हा । जाणों एका नामा विठोबाच्या ॥ १ ॥ नाचेन मी सुखें वैष्णवांचे मेळीं । दिंडी टाळघोळी आनंदें या ॥ २ ॥ शांति क्षमा दया तें मी काय जाणें । विठ्ठल कीर्तनें वांचूनियां ॥ ३ ॥ कराया एकांत सेवूं तया वना । आनंदें या जनामाजी असों ॥ ४ ॥ कासया उदास होऊं देहावरी । अमृतसागरीं बुडोनियां ॥ ५ ॥ तुका म्हणे मज असे हा भरवंसा । विठ्ठल सारसा चालतसे ॥ ६ ॥

१०७.

न कळे तों काय करावा उपाव । जेणें राहे भाव तुझ्या पायीं ॥ १ ॥
येऊनियां वास करिसी हृदयीं । ऐसें घडे कई कासयानें ॥ २ ॥

ाच भावें तुझें चिंतन मानसीं । राहे हें करिसी कैं गा देवा ॥३॥
टिकें हें माझें करूनियां दुरी । साच तूं अंतरीं येउनि राहें ॥४॥
तुका ह्मणे मज राखावें पतिता । आपुलिया सत्ता पांडुरंगा ॥ ५ ॥

## १०८.

संसार तो कोण लेखे । आम्हां सखे हरिजन ॥ १ ॥ काळ ब्रम्हांनंदें सरे । आवडी उरे संचली ॥ २ ॥ स्वप्नीं तेही नाहीं चिंता । रात्रीं जातां दिवस ॥ ३ ॥ तुका म्हणे ब्रम्हरसें । होय रिसें भोजन ॥ ४ ॥

## १०९.

येईं गा विठ्ठला येईं गा विठ्ठला । प्राण हा फुटला आळवितां॥१॥
डियेलें वनीं थोर चिंतवनीं । उशीर कां अझूनी लावियेला ॥ २ ॥
ाय तुज नाहीं लौकिकाची शंका । आपुल्या बाळका मोकलितां॥३॥
का म्हणे बहु खंती वाटे जीवा । धरियेलें देवा दुरी दिसे ॥ ४ ॥

## ११०.

अवघ्या भूतांचें केलें संतर्पण । अवघीच दान दिली भूमि ॥१॥
वघाचि काळ दिन रात्र शुद्धि । साधियली विधी पर्व काळ ॥२॥
वघेंच तीर्थें व्रतें केले योग । अवघेंचि सांग जालें कर्म ॥ ३ ॥
वघेंचि आलें फळ आम्हां हातां । अवघेंचि अनंता समर्पिलें ॥४॥
का म्हणे आतां बोलों अबोलणें । कायावाचामनें उरलों नाहीं ॥५॥

## १११.

देवाचिये माथां घालुनियां भार । सांडीं कलेवर ओंवाळुनि ॥१॥
ाथिला हा छंद अभिमान अंगीं । निमित्याच्ये वेगीं सारीं ओझें ॥२॥

करुणावचनीं लाहों एकसरें । नेदावें दुसरें आड येऊं ॥ ३ ॥ तुका म्हणे सांडीं लटिक्याचा संग । आनंद तो मग प्रगटेल ॥ ४ ॥

११२.

सोपें वर्म आम्हां सांगितलें संतीं । टाळ दिंडी हातीं घेउनि नाचा॥ १॥ समाधीचें सुख सांडा ओंवाळूनी । ऐसा या कीर्तनीं ब्रम्हरस ॥ २ ॥ पुढती वडे चढतें सेवन आगळें । भक्ति भाग्य बळें निर्भरता ॥३॥ उपजोंचि नये संदेह चित्तासी । मुक्ति चारी दासी हरिदासांच्या॥४॥ तुका म्हणे मन पावोनि विश्रांति । त्रिविध नासती ताप क्षणें॥५॥

११३.

पाहातोंसी काय । आतां पुढें करीं पाय॥१॥वरि ठेवूं दे मस्तक । ठेलों जोडोनि हस्तक ॥ २ ॥ बरवें करीं सम । नको भंगों देऊं प्रेम ॥ ३ ॥ तुका म्हणे चला । पुढती सामोरे विठ्ठला ॥ ४ ॥

११४.

भक्त ऐसे जाणा जे देहीं उदास । गेले आशापाश निवारूनि ॥१॥ विषय तो त्यांचा जाला नारायण । नावडे जन धन मातापिता ॥२॥ निर्वाणीं गोविंद असे मागेंपुढें । कांहींच सांकडें पडों नेदीं ॥ ३ ॥ तुका म्हणे सत्य कर्मा व्हावें साह्य । घातलिया भय नर्का जाणें॥४॥

११५.

यासाठीं केला होता अट्टाहास । शेवटचा दिस गोड व्हावा ॥१॥ आतां निश्चितीनें पावलों विसांवा । खुंटलिया धांवा तृष्णेचिया ॥२॥ कवतुक वाटे जालिया वेंचाचें । नांव मंगळाचें तेणें गुणें ॥ ३ ॥ तुका म्हणे मुक्ति परिणिली नोवरी । आतां दिवस चारी खेळीमेळीं॥४॥

११६.

याती शूद्र वैश्य केला वेवसाव । आधीं तो हा देव कुळ पूज्य ॥१॥ नये बोलों परि पाळिलें वचन । केलियाचा प्रश्न तुम्हीं संतीं ॥ २ ॥ संवसारें जालों अति दुःखें दुःखी । मायबापें सेखीं क्रमिलिया ॥३॥ दुष्काळें आटिलें द्रव्य नेला मान । स्त्री एकी अन्नअन्न करितां मेली ॥ ४ ॥ लज्जा वाटे जीवा त्रासलों या दुःखें । वेवसाय देखें तुटी येतां ॥ ५ ॥ देवाचें देऊळ होतें जें भंगलें । चित्तासी तें आलें करावेंसें ॥ ६ ॥ आरंभीं कीर्तन करीं एकादशी । नव्हतें अभ्यासीं चित्त आधीं ॥ ७ ॥ कांहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें । विश्वास आदरें करोनियां ॥ ८ ॥ गाती पुढें त्यांचें धरावें ध्रुपद । भावें चित्त शुद्ध करोनियां ॥ ९ ॥ संतांचें सेविलें तीर्थ पायवणी । लाज नाहीं मनीं येऊं दिली ॥ १० ॥ टाकला तो कांहीं केला परउपकार । केलें हें शरीर कष्टवूनि ॥ ११ ॥ वचनें मानिलीं नाहीं सुहृदांचीं । समूळ प्रपंचीं वीट आला ॥१२॥ सत्य असत्यासी मन केलें ग्वाही । मानियेलें नाहीं बहु मतां ॥ १३ ॥ मानियेला स्वप्नीं गुरूचा उपदेश । धरिला विश्वास दृढ नामीं ॥१४॥ यावरी या झाली कवित्वाची स्फूर्ति। पाय धरिले चित्तीं विठोबाचे ॥ १५ ॥ निषेधाचा कांहीं पडिला आघात । तेणें मध्यें चित्त दुखवलें ॥ १६॥ बुडविल्या वह्या बैसलों धरणें । केलें नारायणें समाधान ॥ १७ ॥ विस्तारीं सांगतां बहुत प्रकार । होईल उशीर आतां पुरे ॥ १८ ॥ आतां आहे तैसा दिसतो विचार । पुढील प्रकार देव जाणे ॥ १९ ॥ भक्तां नारायण नुपेक्षी सर्वथा । कृपावंत ऐसा कळों आलें ॥ २० ॥ तुका म्हणे माझें सर्व भांडवल । बोलविले बोल पांडुरंगें ॥ २१ ॥

## ११७.

ऐका वचन हें संत । मी तों आगळा पतित । काय काजें प्रीत । करीतसां आदरें ॥ १ ॥ माझें चित्त मज ग्वाही । सत्य तरलों मी नाहीं । एकाचिये बाहीं । एक देखी मानिती ॥ २ ॥ बहु पीडिलों संसारें । मोडीं पिसें पिटी ढोरें । न पडतां पुरे । या विचारें राहिलो ॥ ३ ॥ सहज सरलें होतें कांहीं । द्रव्य थोडें बहु तेंही । त्याग केला नाहीं । दिलें द्विजां याचकां ॥ ४ ॥ प्रिया पुत्र बंधु । यांचा तोडिला संबंधु । सहज जालों मंदु । भाग्यहीन करंटा ॥ ५ ॥ तोंड न दाखवावें जना । शिरें सांदीं भरे राना । एकांत तो जाणा । तयासाठीं लागला ॥ ६ ॥ पोटें पिटिलें काहारें । दया नाहीं या विचारें । बोलावितां बरें । सहज म्हणे यासाठीं ॥ ७ ॥ सहज वडिलां होती सेवा । म्हणोनि पूजितों या देवा । तुका म्हणे भावा- । साठीं झणीं ध्या कोणी ॥ ८ ॥

## ११८.

दास झालों हरिदासाचा । बुद्धि कायामनें वाचा ॥ १ ॥ तेथें प्रेमाचा सुकाळ । टाळमृदंग कल्लोळ ॥ २ ॥ नामें दुष्टबुद्धि सकळ । समाधि हरिकीर्तनीं ॥ ३ ॥ ऐकतां हरिकथा । भक्ति लागे त्यां अभक्तां ॥ ४ ॥ देखोनि कीर्तनाचा रंग । कैसा उभा पांडुरंग ॥५॥ हें सुख ब्रह्मादिकां । नाहीं नाहीं म्हणे तुका ॥ ५ ॥

## ११९.

अंतरीचा भाव जाणोनियां गुज । तैसें केलें काज पांडुरंगा ॥१॥ घातलें वचन न पडेचि खालीं । तूं आम्हां माउली अनाथांची ॥२॥

मज याचकाची पुरविली आशा । पंढरीनिवासा मायबापा ॥ ३ ॥
नाशिली आशंका माझिया जीवाची । उरली भेदाची होती कांहीं॥४॥
**तुका** म्हणे आतां केलें मी निर्भर । गाईन अपार गुण तुझे ॥ ५ ॥

## १२०.

उदार कृपाळु अनाथांचा नाथ । ऐकतोसी मात शरणागतां ॥१॥
सर्व भार माथां चालविसी त्यांचा । अनुसरले वाचा काया मनें ॥२॥
पाचारितां उभा राहासी जवळी । पाहिजे तें काळीं पुरवावें ॥ ३ ॥
चालतांही पंथ सांभाळीसी वाटे । वारिसील कांटे खडे हातें ॥ ४ ॥
**तुका** म्हणे चिंता नाहीं तुझ्या दासां । तूं त्यांना कोंवसा सर्वभावें॥५॥

## १२१.

काय कीर्ति करूं लोक दंभ मान । दाखवीं चरण तुझे मज॥१॥
मज आतां ऐसें नको करूं देवा । तुझा दास जावा वायांवीण ॥२॥
होइल थोरपणें जाणीवेचा भार । दुरावेन दूर तुझ्या पायीं ॥ ३ ॥
अंतरींचा भाव काय कळे लोकां । एक मानी एका देखोवेखीं ॥४॥
**तुका** म्हणे तुझे पाय आतुडती । त्या मज विपत्ति गोड देवा ॥५॥

## १२२.

आतां माझा सर्वभावें हा निर्धार । न करीं विचार आणिकांसी ॥ १ ॥ सर्व भावें नाम गाईन आवडी । सर्व माझी जोडी पाय तुझे ॥ २ ॥ लोटांगण तुझ्या घालीन अंगणीं । पाहेन भरोनि डोळे मुख ॥ ३ ॥ निर्लज्ज होऊनि नाचेन रंगणीं । येऊं नेदीं मनीं शंका कांहीं ॥ ४ ॥ अंकित अंकिला दास तुझा देवा । संकल्प हा जीवा **तुका** म्हणे ॥ ५ ॥

## १२३.

जनीं जनार्दन ऐकतों हे मात । कैसा तो वृत्तांत न कळे आम्हां ॥ १ ॥ जन्म जरा मरण कवण भोगी भोग । व्याधि नाना रोग सुखदुःखें ॥ २ ॥ पापपुण्यें शुद्धाशुद्ध आचरणें । हीं कोणाकारणें कवणें केलीं ॥ ३ ॥ आम्हां मरण नाश तूं तव अविनाश । कैसा हा विश्वास साच मानूं ॥ ४ ॥ तुका म्हणे तूंचि निवडीं हें गुढार । दाखवीं साचार तेंचि मज ॥ ५ ॥

## १२४.

धीर तो कारण । साह्य होतो नारायण । नेदीं होऊं सीण । वाहे चिंता दासांची ॥ १ ॥ सुखें करावें कीर्तन । हर्षें गावे हरिचे गुण । वारी सुदर्शन । आपणचि कळिकाळा ॥ २ ॥ जीव वेंची माता । बाळा जडभारी होतां । तो तों नव्हे दाता । प्राकृतां यांसारिखा॥३॥ हें तों माझ्या अनुभवें । अनुभवा आलें जीवें । तुका म्हणे सत्य व्हावें । आहाच न ये कारणा ॥ ४ ॥

## १२५.

वीर विठ्ठलाचे गाढे । कळिकाळ पायां पडे ॥ १ ॥ करिती घोष जयजयकार । जळति दोषाचे डोंगर ॥ २ ॥ क्षमा दया शांति । बाण अभंग हे हातीं ॥ ३ ॥ तुका म्हणे बळी । तेचि एक भूमंडळीं ॥ ४ ॥

## १२६.

न करीं तळमळ राहें रे निश्चळ । अहो हा कृपाळ स्वामी माझा ॥१॥ अविनाश सुख देईल निर्वाणी । चुकतील खाणी चौऱ्यांशीच्या ॥२॥

आणिकिया जीवां होईल उद्धार । तेहि उपकार घडती कोटि ॥३॥ आहिक्य परत्रीं होसील सरता । वाचे उच्चारितां रामराम ॥ ४ ॥ तुका म्हणे सांडीं संसाराचा छंद । मग परमानंद पावसील ॥ ५ ॥

१२७.

कां रे दास होसी संसाराचा खर । दुःखाचे डोंगर भोगावया ॥१॥ मिष्टान्नाची गोडी जिव्हेच्या अगरीं । मसक भरल्यावरी स्वाद नेणें ॥२॥ आणीकही भोग आणिका इंद्रियांचे । नाहीं ऐसे साचे जवळी कांहीं ॥ ३ ॥ रूप दृष्टि धाय पाहातां पाहातां । न घडे सर्वथा आणि तृष्णा ॥ ४ ॥ तुका म्हणे कां रे नाशिवंतासाठीं । देवासवें तुटी करितोसी ॥ ५ ॥

१२८.

यातीमतिहीन रूपें लीन दीन । आणीक अवगुण जाणोनियां ॥ १ ॥ केला त्या विठ्ठलें माझा अंगीकार । ऐसा हा विचार जाणोनियां ॥ २ ॥ जें कांहीं करितों तें माझें स्वहित । आली हे प्रचीत कळों चित्ता ॥ ३ ॥ जालें सुख जीवा आनंद अपार । परमानंदें भार घेतला माझा ॥ ४ ॥ तुका म्हणे यासी नामाचा अभिमान । म्हणोनि शरण तारी बळें ॥ ५ ॥

१२९.

बहु उतावीळ भक्तीचिया काजा । होसी केशीराजा मायबापा ॥१॥ तुझ्या पायीं मज जालासे विश्वास । ह्मणोनियां आस मोकलिली ॥२॥ ऋषि मुनि सिद्ध साधक अपार । कळाला विचार त्यांसी तुझा ॥३॥ नाहीं नासतें सुख दिलें तयांस । जाले जे उदास सर्व भावें ॥ ४ ॥ तुका म्हणे सुख न माय मानसीं । धरिले जीवेंसीं पाय तुझे ॥ ५ ॥

## १३०.

मायामोहजाळीं होतों सांपडला । परि या विठ्ठलें कृपा आली ॥१॥
काढूनि बाहेरी ठेविलों निराळा । कवतुक डोळां दाखविलें ॥ २ ॥
नाचे उडे माया करी कवतुक । नाशवंत सुखें साच केलों ॥ ३ ॥
रडें फुंदें दुःखें कुटितील माथा । एकासी रडतां तेंही मरे ॥ ४ ॥
तुका म्हणे मज वाटतें नवल । मी हें माझें बोल ऐकोनियां ॥ ५ ॥

## १३१.

वृद्धीचा जनिता लक्ष्मीचा पती । आठवितां चित्तीं काय नव्हे ॥१॥
आणिकां उपाया कोण वांटी मन । सुखाचें निधान पांडुरंग ॥ २ ॥
गीतीं गावों नाचों छंद वावों टाळी । वैष्णवांचे मेळीं सुखरूप ॥३॥
अनंत ब्रम्हांडें एके रोमावळी । आम्ही केला भोळीं भावें उभा ॥४॥
लटिका हा केला संसारसिंधु । मोक्ष करा बंधु नाहीं पुढें ॥ ५ ॥
तुका म्हणे ज्यांच्या नामाचें अंकित । राहिलों निश्चित त्यांच्या बळें ॥ ६ ॥

## १३२.

घेसी तरी घेईं संतांची हे भेटी । आणीक ते गोष्टी नको मना ॥१॥
सर्व भावें त्यांचें देव भांडवल । आणीक ते बोल न बोलती ॥२॥
करिसील तो करीं संतांचा सांगात । आणीक ते मात नको मना ॥३॥
बैससील तरी बैस संतांमधीं । आणिक ते बुधी नको मना ॥४॥
जासी तरी जाईं संतांचिया गांवा । होईल विसावा तेथें मना ॥५॥
तुका म्हणे संत सुखाचे सागर । मना निरंतर धणी घेईं ॥ ६ ॥

१३३

संतांचिये गांवीं प्रेमाचा सुकाळ । नाहीं तळमळ दुःखलेश ॥१॥
तेथें मी राहीन होऊनि याचक । घालितील भीक तेचि मज ॥२॥
संतांचिये गांवीं बरो भांडवल । अवघा विठ्ठल धन वित्त ॥ ३ ॥
संतांचें भोजन अमृताचें पान । करिती कीर्तन सर्वकाळ ॥ ४ ॥
संतांचा उदीम उपदेशाची पेंठ । प्रेम सुख साठीं घेती देती ॥ ५ ॥
तुका म्हणे तेथें आणिक नाहीं परी । म्हणोनि भिकारी झालों त्यांचा॥६॥

१३४.

लेंकराची आळी न पुरवी कैसी । काय तयापाशीं उणें जालें ॥१॥
आम्हां लडिवाळां नाहीं तें प्रमाण । कांहीं ब्रह्मज्ञान आत्मस्थिति ॥२॥
वचनाचा घेईन अनुभव पदरीं । जें हें जनाचारीं मिरवलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझी भोळीवेची आटी । दावीन शेवटीं कौतुक हें ॥४॥

१३५.

भाग्यवंता हेंचि काम । मापी नाम वेखरी ॥ १ ॥ आनंदाची तुष्टि अंगीं । श्रोते संगीं उद्धरती ॥ २ ॥ पिकलें तया खाणें किती । रंगतीस सुकाळ ॥३॥ तुका करी प्रणिपात । दंडवत आचारियां॥४॥

१३६.

नको सांडूं अन्न नको सेवूं वन । चिंतीं नारायण सर्व भोगीं ॥ १ ॥ मातेचिये खांदीं बाळ नेणें सीण । भावना त्या भिन्न मुंडिया ॥ २ ॥ नको गुंतों भोगीं नको पडों त्यागीं । लावुनि सरें अंगीं देवाचिया ॥ ३ ॥ तुका म्हणे नको पुसों वेळोवेळां । उपदेश वेगळा उरला नाहीं ॥ ४ ॥

## १३७.

अवघी मिथ्या आटी । राम नाहीं जंव कंठीं ॥ १ ॥ सावधान सावधान । उगवीं संकल्पीं हें मन ॥ २ ॥ सांडिले ते मांडे । आग्रह उरल्या काळ दंडे ॥ ३ ॥ तुका म्हणे आलें भागा । देउनि चिंतीं पांडुरंगा ॥ ४ ॥

## १३८.

कोण पुण्यें यांचा होईन सेवक । जींहीं द्वंद्वादिक दुराविलें ॥१॥ ऐसीं वर्मे मज दावीं नारायणा । अंतरींच्या खुणा प्रकटोनी ॥ २ ॥ बहु अवघड असे संतभेटी । तरी जगजेठी करुणा केली ॥ ३ ॥ तुका म्हणे मग नयें वृत्तीवरी । सुखाचे शेजारीं पहुडईन ॥ ४ ॥

## १३९.

नाम घेतां मन निवे । जिव्हे अमृतचि सवे ॥ होताती बरवे । ऐसे शकुन लाभाचे ॥ १ ॥ मन रंगलें रंगलें । तुझ्या चरणीं स्थिरावलें ॥ केलिया विठ्ठलें । ऐसी कृपा जाणावी ॥ २ ॥ जालें भोजनसें दिसे । चित्त पडोनि ठेला इच्छे ॥ धालियाच्या ऐसे । अंगा येतील उद्गार ॥ ३ ॥ सुख भेटों आलें सुखा । निध सांपडला मुखा ॥ तुका म्हणे लेखा । आतां नाहीं आनंदा ॥ ४ ॥

## १४०.

पुराणींचा इतिहास । गोड रस सेविला ॥ १ ॥ नव्हती हे अहाच बोल । मोकळें फोल कवित्व ॥ २ ॥ भावें द्या रे भावें घ्या रे । एकदां जा रे पंढरिये ॥ ३ ॥ भाग्यें आलेति मनुष्यदेहा । तो हा पाहा विठ्ठल ॥ ४ ॥ पाप पुण्या करिल झाडा । जाइल पीडा

जन्माची ॥५॥ घ्यावी हातीं टाळ दिंडी । गावे तोंडीं गुणवाद ॥६॥ तुका ह्मणे घटापटा । नलगे वाटा शोधाव्या ॥ ७ ॥

## १४१.

पाहा रे हें दैवत कैसें । भक्तिपिसें भाविक ॥ १ ॥ पाचारिल्या सरिसें पावे । ऐसी सवे बराडी ॥ २ ॥ शुष्क काष्टीं गुरुगुरी । लाज हरि न धरितां ॥ ३ ॥ तुका म्हणे अर्ध नारी । ऐसीं धरी रूपडीं हा ॥ ४ ॥

## १४२.

अमर आहां अमर आहां । खरें कीं पहा खोटें हें ॥ १ ॥ न ह्मणा देह माझा ऐसा । मग भरवंसा कळेल ॥ २ ॥ कैंचा धाक कैंचा धाक । सकळिक हें आपुलें ॥ ३ ॥ देवचि बरे देवाचि बरे । तुका म्हणे खरे तुह्मी ॥४॥

## १४३.

काम नाहीं काम नाहीं । जालों पाहीं रिकामा ॥ १ ॥ फावल्या त्या करूं चेष्टा । निश्चळ द्रष्टा बैसोनी ॥ २ ॥ नसत्या छंदें नसत्या छंदें । जग विनोदें विव्हळतसे ॥ ३ ॥ एकाएकीं एकाएकीं । तुका लोकीं निराळा ॥ ४ ॥

## १४४.

नलगे देशकाळ । मंत्रविधान सकळ ॥ मनाचे निश्चळ । करुनी करुणा भाकावी ॥१॥ येतो बैसलिया ठाया । आसनें व्यापी देवराया । निर्मळ ते काया । अधिष्ठान तयाचें ॥ २ ॥ कल्पनेचा साक्षी । तरी आदरेंचि लक्षी । आवडीनें भक्षी । कोरडें धान्य मटमटां ॥३॥

घेणें तरी भाव । लक्षी दासाचा उपाव । तुका म्हणे जीव । जीवीं मेळविल अनंत ॥ ४ ॥

## १४५.

भक्तिसुख आलें नाहीं अनुभवा । तों मी ज्ञान देवा काय करूं॥१॥ नसावें जी तुम्ही कांहीं निश्चितीनें । माझिया वचनें अभेदाच्या ॥२॥ एकाएकीं मन नेदी समाधान । देखिल्या चरण वांचूनियां ॥ ३ ॥ तुका म्हणे वाचा गुणीं लांचावली । न राहे उगली मौन्य मज ॥४॥

## १४६.

आला भागासी तो करीं वेवसाव । परि राहो भाव तुझ्या पायीं ॥ १ ॥ काय चाले तुम्हीं बांधलें दातारा । वाहिलिया भारा उसंतितों ॥ २ ॥ शरीर तें करी शरीराचे धर्म । नको देऊं वर्म चुको मना ॥ ३ ॥ चळण फिरवी ठाव बहुवस । न घडो आळस चिंतनाचा ॥ ६ ॥ इंद्रियें करोत आपुले व्यापार । आवडीसी थार देईं पायीं ॥ ५ ॥ तुका म्हणे नको देऊं काळाहातीं । येतों काकुळती म्हणवुनी ॥ ६ ॥

## १४७.

आणीक कोणाचा न करीं मी संग । जेणें होय भंग माझ्या चित्ता ॥ १ ॥ विठ्ठलावांचूनि आणीक जे वाणी । नाइकें मी कानीं आपुलिया ॥ २ ॥ समाधानासाठीं बोलावी हे मात । परि माझें चित्त नाहीं कोठें ॥ ३ ॥ जिवाहूनि मज तेचि आवडती । आवडे ज्यां चित्तीं पांडुरंग ॥ ४ ॥ तुका म्हणे माझें तोचि जाणे हित । आणिकांच्या चित्त नेदीं बोला ॥ ५ ॥

## ३१४

तुझे दारींचा कुतरा । नको मोकलूं दातारा ॥ १ ॥ धरणें घेतलें द्वारांत । नको धरूनि उठवूं हात ॥ २ ॥ घातली मुरकुंड । झालों शिरोमणी लंड ॥ ३ ॥ तुका ह्मणे जगजीवना । ब्रीद पाहें नारायणा ॥ ४ ॥

## ३१५.

कां जी आम्हां होतें दोषाचें दर्शन । तुज समर्पून देहभाव ॥१॥ पांडुरंगा कृपाळुवा दयावंता । धरसील सत्ता सकळही ॥ २ ॥ कां जी आम्हांवरी आणिकांची सत्ता । तुह्मांसी असतां जवळिकें ॥ ३ ॥ तुका म्हणे पायीं केलें निवेदन । उचित तें ज्ञान करीं सत्ता ॥४॥

## ३१६.

संतोषे मांउली आरुषा वचनीं । वोरसोनि स्तनीं लावी बाळा ॥१॥ तैसें प्रेमळाचें अवघेंचि गोड । पुरवितो कोड पांडुरंग ॥ २ ॥ सेवा करी साहे निष्ठुर उत्तरें । त्याचें वाहे बरें तेंची मनीं ॥ ३ ॥ तुका म्हणे इच्छावस खेळे खेळ । चिंता ते सकळ कांहीं नेणें ॥ ४ ॥

## ३१७.

तुह्मी माझा करा देवा अंगीकार । हा नाहीं विचार मजपाशीं ॥१॥ आतां दोहीं पक्षीं लागलें लांछन । देवभक्तपण लाजविलें ॥ २ ॥ एकांतीं एकुलें न राहे निश्चल । न बैसे चपळ मन ठायीं ॥ ३ ॥ पायीं महत्वाची पडिली श्रृंखळा । बांधविला गळा स्नेहा हातीं ॥ ४ ॥ शरीर सोकलें देखलिया सुखा । कदान्न हें मुखा रुचेचिना ॥ ५ ॥ तुका ह्मणे झाला अवगुणांचा थारा । वाढली हे निद्रा आळस बहु ॥६॥

## अभंग ३१८.

कवतुकवाणी बोसतसें लाडें । आरुष वांकडें करूनि मुख ॥१॥ दुजेपणीं भाव नाहीं हे आशंका । जननी बाळकांमध्यें भेद ॥२॥ सलगी दुरूनि जवळी पाचारूं । धांवोनियां करूं अंगसंग ॥ ३ ॥ धरूनि पालव मागतों भातुकें । आवडीचें निकें प्रेमसुख ॥ ४ ॥ तुका म्हणे तुज आमचीच गोडी । ऐसी हे आवडी कळों आली ॥ ५ ॥

## ३१९.

जेणें माझें चित्त राहे तुझ्या पायीं । अखंड तें देईं प्रेमसुख ॥१॥ देहभाव राखा दीन करूनियां । जनाचारी वांयां जाय तैसा ॥ २ ॥ द्रव्य दारा नको मानाची आवडी । कवणेविशीं गोडी प्रपंचाची ॥३॥ तुझें नाम माझें धरूनियां चित्त । एकांत लोकांत सदा राहो ॥ ४ ॥ तुका म्हणे तुझे जडोनियां पायीं । झालों उतराई पांडुरंगा ॥ ५ ॥

## ३२०.

काय सांगों आतां संतांचे उपकार । मज निरंतर जागविती ॥१॥ काय द्यावें त्यांसीं व्हावें उतराई । ठेवितां हा पायीं जीव थोडा ॥२॥ सहज बोलणें हित उपदेश । करूनि सायास शिकविती ॥ ३ ॥ तुका म्हणे वत्स धेनुवेचे चित्तीं । तैसे मज येती सांभाळीत ॥ ४ ॥

## ३२१.

नकळे जी भक्ती काय करूं सेवा । संकोचोनि देवा राहिलोंसे ॥ १ ॥ जोडोनियां कर राहिलों निवांत । पायांपाशीं चित्त ठेवूनियां ॥ २ ॥ दिशाभूली करीं स्थळीं प्रदक्षणा । भ्रमें नारायणा कष्टविलें ॥ ३ ॥ तुका म्हणे झालों आज्ञेचा पाळक । जीवनासी एक ठाव केला ॥ ४ ॥

## ३२२.

श्रवणें कीर्तनें जाहले ते पावन । सनकादिक जाण परमभक्त ॥१॥ जाहली पैं विश्रांति याचकां सकळां । जीवीं जीवनकळा श्रीमूर्तिरया ॥२॥ पादसेवनें अक्रूर जाहला ब्रह्मरूप । प्रत्यक्ष स्वरूप गोविंदाचें ॥३॥ सख्यत्वें अर्जुन नरनारायण । सृष्टि जनार्दन एकरूप ॥ ४ ॥ दास्यत्व निकट हनुमंतें पैं केलें । म्हणोनि देखिले रामचरण ॥ ५ ॥ बळी आणि भीष्म प्रल्हाद नारद । बिभीषण वरद चंद्रअर्क ॥ ६ ॥ व्यास आणि वसिष्ठ वाल्मीकादिक । आणि पुंडलीक शिरोमणी ॥ ७ ॥ शुकादिकयोगी रंगले श्रीरंगीं । परीक्षितीच्या अंगीं ठसावलें ॥ ८ ॥ उद्धव यादव आणि ते गोपाळ । गोपिकांचा मेळ ब्रह्मरूप ॥ ९ ॥ अनंत भक्त राशि तरले वानर । ज्ञानदेवा वर चिदानंदीं ॥ १० ॥

## ३२३

स्मरतां निवृत्ति पावलों विश्रांती ॥ संसाराची शांति जाहली माझ्या ॥१॥ नमितां ज्ञानदेवा पावलों विसावा ॥ संसारीचा हेवा विसरलों ॥२॥ सुखाचा निधान तो माझा सोपान ॥ विश्रांतीचें स्थान मुक्ताबाई ॥३॥ चांगदेव माझा आनंदाचा तारू ॥ सुखाचा सागरू वटेश्वरू ॥ ४ ॥ सुखाचा सागर विसोबा खेचर ॥ नरहरी सोनार प्राण माझा ॥ ५ ॥ आठवितां नामा पावलों विश्रामा ॥ मोक्षमार्गीं आह्मा वाट झाली ॥६॥ परिसा भागवत जिवा आवडता ॥ गोरा आणि सांवता सखे माझे॥७॥ आनंदाचा कंदु जोगा परमानंदु ॥ योगिया मुकुंदु आत्मा माझा ॥८॥ जनजसवंत सूरदास संत ॥ नित्य प्रणिपात वैष्णवांसी ॥ ९ ॥ वंदुं भानुदास वैष्णवांचे कुळीं ॥ ज्यासी वनमाळी मागेंपुढें ॥ १० ॥ बाळपणीं जेणें भानु आराधिला ॥ वंश निरविला देवराया ॥ ११ ॥

धन्य त्यांचा वंश धन्य त्यांचें कुळ ॥ परब्रह्म केवळ त्यांचे वंशीं॥१२॥ **एकाजनार्दनीं** संतांचें स्तवन ॥ जनीं जनार्दन नमियेला ॥ १३ ॥

### ३२४.

निवृत्ति शोभे मुक्ताकार ॥ ज्ञान सोपान वटेश्वर ॥ १ ॥ विठु पंढरींचे राणे ॥ ल्याले भक्तांचीं भूषणें ॥ २ ॥ खेचर विसा जगमित्रनागा ॥ कुंडलें जोडा विठोबा जोगा ॥ ३ ॥ दंतपंक्तीचा झल्लाळ ॥ तो हा कन्हय्या रसाळ ॥ ४ ॥ बाहु शोभे बाहुवट ॥ गोरा सांवता नैट पाट ॥ ५ ॥ कंठीं जाणा एकविंद ॥ तो हा जोगा परमानंद ॥ ६ ॥ गळां शोभे वैजयंती ॥ तीसी मुक्ताई म्हणती ॥ ७ ॥ अखंड हृदयीं माझ्या बापा ॥ पदकीं शोभे नामा शिंपा ॥ ८ ॥ कटीं कटिसूत्रावरी ॥ तो हा सोनार नरहरी ॥ ९ ॥ कासे कसिला पीतांबर ॥ तो हा जाणावा कबीर ॥ १० ॥ जानुजंघन अतिसरळ । कान्होपात्रा ते विशाळ ॥११॥ वामचरणींचा तोडर ॥ परिसा रुळे तो किंकर॥१२॥ चरणींच्या रुळती घंटा ॥ नामयाचा नारा विठा ॥ १३ ॥ चरणींची वीट निर्मळ ॥ तो हा जाणा चोखामेळ ॥ १४ ॥ चरणातळींची ऊर्ध्वरेखा ॥ जाहला **जनार्दन एका** ॥ १५ ॥

### ३२५.

पंढरीये माझें माहेर साजणी । वोविया कांडणीं गाऊं गीतीं ॥१॥ राही रखुमाई सत्यभामा माता । पांडुरंग पीता माहेर माझें ॥ २ ॥ उद्धव अक्रूर व्यास अंबऋषी । भाई नारदासी गौरवीन ॥ ३ ॥ गरुडबंधु लडिवाळ पुंडलीक । तयांचें कवतुक वाटे मज ॥ ४ ॥ मज बहु गोत संत आणि महंत । नित्य आठवित ओंवियेसी ॥ ५ ॥ निवृत्ती ज्ञानदेव सोपान चांगया । जिवलगा माझीया नामदेवा ॥६॥

नागो जगमित्रा नरहरी सोनारा । रोहिदास कबीरा सोयरिया ॥७॥
परिसा भागवत सूरदास सांवता । गाईन नेणतां सकळिकांसी ॥८॥
चोखा मेळा संत सोयरा जीवाचा । न पडे तयाचा विसर मज ॥९॥
जीवांच्या जीवना एकाजनार्दना । पाठक हा कान्हा मिराबाई ॥१०॥
आणिकही संत महानुभाव मुनी । सकळांचे चरणीं जीव माझा ॥११॥
आनंदें वोंविया गाईन मी त्यांसी । जाती पंढरीसी वारकरी ॥ १२ ॥
तुका म्हणे माझा बळिया बापमाये । हरुषें नांदताहे घराचारीं ॥१३॥

३२६.

हरिविण चित्त न धरी विपरीत । तरताती पतित रामनामें ॥ १ ॥
विचारुनी पहा ग्रंथ हे अवघे । जेथें तेथें सांगे रामनाम ॥ २ ॥
व्यासादिक भले रामनाम पाठीं । नित्यता वैकुंठीं तयां घर ॥ ३ ॥
शुकादिक मुनी विरक्त संसारीं । रामनाम निर्धारीं उच्चारिलें ॥ ४ ॥
चोरटा वाल्मीक रामनामीं रत । तोही एक सरत रामनामें ॥ ५ ॥
निवृत्ति साचार रामनामें दृढ । अवघेंचि गूढ उगविलें ॥ ६ ॥

३२७.

विस्तार विश्वाचा विवेक पैं साचा । बोलतांचि वाचा हारपती ॥१॥
तें रूप श्रीधर कृष्णाचा आकार । सर्व निराकार एकरूपें ॥ २ ॥
नसते निजीव असते निशिव । उकार मकार भाव मावळती ॥ ३ ॥
निवृत्ति स्वरूप कृष्णरूप आप । विश्वीं विश्वदीप आपोआप ॥ ४ ॥

३२८.

निर्गुणाची पेटी सगुणासी आली । अर्धमात्रा जाहली इच्छावशें॥१॥
भक्ति प्रेमभावें प्रगटली दैवें । ओळखून घ्यावें गुरुकृपें ॥ २ ॥ निवृत्तिप्रसादें स्वयं आत्मखूण । मुक्ताई सोपान ज्ञानदेवीं ॥ ३ ॥

## ३२९.

रामकृष्ण नामें हीं दोन्ही साजिरीं। हृदयमंदिरीं स्मरा कां रे ॥१॥ आपुली आपण करा सोडवण। संसारबंधन तोडा वेगीं ॥२॥ **ज्ञानदेवा** ध्यानीं रामकृष्णमाळा। हृदयीं जिव्हाळा श्रीमूर्ति रया ॥ ३ ॥

## ३३०.

प्रेमाचा जिव्हाळा नाम मुखासी आलें। सार्थक पैं झालें संसाराचें॥१॥ केशवनामसार विठ्ठल उच्चार। नाम निरंतर हृदयीं वसो ॥२॥ पाहतां हा भाव लीला विग्रह। तेथींचा अनुभव विरळा जाणे ॥३॥ **बापरखुमादेवीवरु** पाहतां विस्तारु। नामाचा बडिवारु न बोलवे ॥ ४॥

## ३३१.

अंबुला विकुनी घेतली वस्तु। घराचार समस्तु बुडविला ॥ १ ॥ उठोनि गेलिये अज्ञान म्हणाल। म्यां तव कैवल्य जोडियेलें ॥ २ ॥ अंबुला सांडोनि परावा केला। संसार सांडिला काय सांगूं ॥ ३ ॥ **रखुमादेवीवरें** मज पर्णुनी नेलें। सुखचि दिधलें काय सांगों ॥४॥

## ३३२.

देखावयालागीं जंव आर्तीतें पाहिलें। तंव मनुभुवनीं व्यापिलें गे माय ॥ १ ॥ नवलाव जाहलें जग हरीच होउनि ठेलें। आठवूं विसरलें काय करूं ॥ २ ॥ **बापरखुमादेवीवर** विठ्ठलें साच केलें। लोह परिसा झगटलें तैसें जाहलें वो माय ॥ ३ ॥

## ३३३.

तुझी गुणकीर्ति ऐकोनी आर्त मन उचललें। आलिंगना धाविन्नलें उतावीळ ॥ १ ॥ तनु मनु विगुंतलें मन वाचा गुंतलें। मी माझें विसरलें दरुशन गे माये ॥ २ ॥ उतावीळपणें भुजा दंड उच-

लें । नेणोनियां ठकचि ठेलें रूप पहातांचि माये ॥ ३ ॥ पातिया
तें नलगे पाहणें तेंचि ठेलें । तैसें **बापरखुमादेवीवर** विठ्ठलें केलें
मीये ॥ ४ ॥

## ३३४.

अवघाचि संसार सुखाचा करीन । आनंदें भरीन तीन्ही लोक
॥१॥ जाईन गे माय तया पंढरपुरा । भेटेन माहेरा आपुलीया ॥२॥
सर्व सुकृतांचें फळ मी लाहीन । क्षेम मी देईन पांडुरंगीं ॥ ३ ॥
**बापरखुमादेवीवरा** विठ्ठलाचे भेटी । आपुल्या संसारा साठी करुनी
ठेलों ॥ ४ ॥

## ३३५.

हरी असे देहीं सर्वकाळ संपन्न । म्हणोनी चिंतन निरंतर ॥१॥
हरिविण नाहीं हरिविण नाहीं । दिशाद्रुम पाहीं बिंबलासे ॥ २ ॥
हरिविण देवो नाहीं अन्य भावो । हरि असे सर्व देहभावीं ॥ ३ ॥
**सोपान** सांगतु हरि सर्वत्रीं वसे । भाग्यवंता दिसे सर्व काळ ॥४॥

## ३३६.

हरि असे देहीं हाचि भाव खरा । वांया तूं सैरा धांवूं नको ॥१॥
धांवतां अवचटें पडसील व्यसनीं । संसार वसणीं योनी माळे ॥२॥
हरि हेंचि ध्यान निरंतर करीं । सबाह्य अभ्यंतरीं एक राम ॥ ३ ॥
**सोपान** ह्मणे राम नांदे सर्वां घटीं । विश्वीं जगजेठी भरलासे ॥४॥

## ३३७.

राम कृष्ण मूर्ति या पूजितसें भावें । सर्व तुवां व्हावें केशीराजा॥१॥
राम राम म्हणे नित्य काळ सदा । नेणें दुजा धंदा तुजविण ॥ २ ॥
माहेर आठवे करितां कामना । तुझे चरणीं वासना जडोनि ठेली ॥३॥

**सोपान** म्हणे सरतें तुजचि आवडतें । माझ्या मनोरथें तुझी आशा ॥ ४ ॥

## ३३८.

राम सर्वोत्तम या नामें निखळ । जन हें सफळ दिसताहे ॥१॥ भिन्न नाहीं दुजें सर्व आप्त राजे । नाचताती भोजें योगीराज ॥२॥ माता पिता देव गृह दारा जन । सर्व जनार्दन सर्वां रूपीं ॥ ३॥ **सोपान** खेचर ब्रह्म माजिवडें । ब्रम्हांडा एवढें आत्माराम ॥ ४ ॥

## ३३९.

मी माझी कल्पना पळाली वासना । जनीं जनार्दना सेवितुसें ॥१॥ तूं तंव संपन्न आमुचें हें धन । सांगितली खूण निवृत्तिदेवीं ॥२॥ तुज माजीं प्रेम गेलें सप्रेम । जपव्रत नेम हारपले ॥ ३ ॥ **सोपान** सगळा न दिसे इहीं डोळां । तूंचि बा गोपाळा आत्माराम ॥ ४ ॥

## ३४०.

जीवाचा शिव जाहला प्राणनाथ । हा निश्चयाचा एकांत जाणे बापा ॥ १ ॥ मग शिवासी जीवाचें नाहीं पां स्मरण । तेथें जन्म-मरण उरलें असे ॥ २ ॥ शिवमाया तनु जाहली पासवरी । केला उद्योग आवरीं पंचभूतें ॥३॥ म्हणे **मुक्ताबाई** वेदो नारायण खुणे । ज्याचें त्यांनीं मनें आटोपिलें ॥ ४ ॥

## ३४१

अलिप्त संसारीं हरिनाम पाठें । जाइजे वैकुंठें मुक्तलग ॥ १ ॥ हरिविण मुक्त न करी वो सर्वदा । संसार आपदा भव तोडी ॥ २ ॥ आशेच्या निराशीं अचेतना मारीं । चेतविला हरि आत्मरूपें ॥३॥ **मुक्ताई** जीवन्मुक्तचि सर्वदा । अभिन्न पैं भेदा भेदियेलें ॥ ४ ॥

३४२.

आहे आहे म्हणुनी पाहों गेलों। कांहीं नाहीं तें पाहोनि आलों॥१॥
ठें गेलों कोठें धाविन्नलों । कोठें नाहीं तें पाहोनि आलों ॥ २ ॥
**चरविसा** ह्मणे मुक्ताबाई । कांहीं नाहीं तें दाउनी देई ॥ ३॥

३४३.

नामबळें देहीं असोनी मुक्त । शांति क्षमा चित्त हरिभजनीं ॥१॥
ा धरा चित्तीं सर्वांभूतीं करुणा । निरंतर वासना हरिरूपीं ॥ २ ॥
धव मुकुंद हरिनाम चित्तीं । सर्व पैं मुक्ति नामपाठें ॥३॥ **मुक्ता**-
वें धन हरिनाम उच्चारु । अवघाचि संसारु मुक्त केला ॥ ४ ॥

३४४.

महाक्षेत्र सप्तपुरीं । माजी शिरोमणी पंढरी ॥ १ ॥ कां रे हिंडसी
थें तेथें । पांडुरंगीं ठेवीं चित्त ॥ २ ॥ चंद्रभागे करितां स्नान ।
ोटी कुळां उद्धरण ॥ ३ ॥ मज आहे हा विश्वास । **चांगा** विठो-
ाचा दास ॥ ४ ॥

३४५.

भावें भक्ति करुनी वैराग्य जोडसी। तरी तूं पावसी ब्रम्हसुख॥१॥
ानतत्वें करीं करीं हा विचार । निर्गुणी आकार निरामय ॥ २ ॥
**ांगया** सोय धरी ज्ञानवटेश्वरीं । **मुक्ताई** जिव्हारीं बोध करी ॥३॥

३४६

केशवाचे भेटी लागलेंसे पिसें । विसरलों कैसें देहभावा॥१॥ जाहली
ाडपणी जाहली झडपणी । संचरलें मनीं रूप आधीं ॥ २ ॥
ालिंपेचि कर्मीं नलिंपेचि धर्मीं । नालिंपे षड्डर्मी पुण्यपापा ॥ ३ ॥
ाणे **गोराकुंभार** सहजीं जीवन्मुक्त। सुखरूप अद्वैत नामदेवा ॥४॥

३४७

कासयासी बहु घालसी मळण । तुज येणेंवीण काय काज ।।१।। एकपणें एक एकपणें एक । एकाचे अनेक विस्तारले ।। २ ।। एकत्व पाहतां शिणलें अवधारा । न चुके वेरझारा चौऱ्याशीच्या ।। ३ ।। म्हणे **गोराकुंभार** कोणी नाहीं दुजें । विश्वरूप तुझें नामदेवा ।।४।।

३४८.

कवणाची स्तुति करूं कवणे वाचे । बोध संकल्पाचे गिळिले मनें ।। १ ।। मन जाहलें मुकें मन जाहलें मुकें । अनुभव सुखें हेलावलें ।।२।। दृष्टींचें पाहणें परतलें मागुतें । राहिलें निवांत नेत्रपातीं ।। ३ ।। म्हणे **गोराकुंभार** निवांत सुख घ्यावें । जीवें वोवाळावें नामयासी ।। ४ ।।

३४९.

पूर्व पुण्य माझें फळासी हें आलें । विठ्ठलें पाहिलें कृपादृष्टी ।।१।। विषयाचा संग सहज तुटला । प्रपंच पैं जाहला परमार्थ ।। २ ।। **गोरियानें** मनीं आठविले पाय । विठोबानें सोय दाखविली ।। ३ ।।

३५०.

नको तुझें ज्ञान नको तुझा मान । माझें आहे मन वेगळेंचि ।।१।। नको तुझी भुक्ति नको तुझी मुक्ति । मज आहे विश्रांति वेगळीच ।।२।। चरणीं ठेवुनि माथा विनवितो **सावंता** । ऐका पंढरीनाथा करीन पूजा ।। ३ ।।

३५१.

शिव ब्रह्मविष्णु तिन्ही देव एक । जो निराकाररूप विठ्ठल माझा ।। १ ।। विठ्ठल नामाचा महिमा अगाध । होणें पूर्णबोध

ऐशापरी ॥ २ ॥ अद्वैतवासना संतांची संगती । वायांचि उपाधि बोलूं नका ॥ ३ ॥ रामकृष्ण हरि मुकुंद मुरारी । हा मंत्र उच्चारीं **सांवता** ह्मणे ॥ ४ ॥

## ३९२.

प्रपंचीं असूनी परमार्थ साधावा । वाचें आठवावा रामकृष्ण ॥१॥ उंचनीच कांहीं न पाहे सर्वथा । पुराणींच्या कथा पुराणींच ॥ २ ॥ घटिका आणि पळ साधीं उतावीळ । वाउगा तो काळ जाऊं नेदीं ॥ ३ ॥ **सांवता** म्हणें वाचे जपे नामावळी । हृदयकमळीं रामकृष्ण ॥ ४ ॥

## ३९३.

जपतप कर्म क्रिया धर्म साधन । वाउगें बंधन उपाधीचें ॥ १ ॥ येणें काय घडे साधन सर्वथा । वाउगाचि शीण व्यथा होत आहे।२। **सांवता** म्हणे सार कंठीं धरीं नाम । नको दुजा नेम वाउगाचि ॥३॥

## ३९४

देहीं देखिली पंढरी । आत्मा अविनाश विटेवरी ॥ १ ॥ तो हा पांडुरंग जाणा । शांति रुक्मिणी निजांगना ॥ २ ॥ आकारलें तितुकें नासे । आत्मा अविनाश विठ्ठल दिसे ॥ ३ ॥ ऐसा विठ्ठल हृदयीं ध्याई । **चोखामेळा** जडला पायीं ॥ ४ ॥

## ३९५.

बोलविला बोले वेद । म्हैसा सुबुद्ध स्वरान्वयें ॥ १ ॥ काय एक न करवे देवा । भिंती चालवा निचेष्टित ॥ २ ॥ शिष्यालागीं देतां बोध । न लगे पलार्ध निमिष्यही ॥ ३ ॥ **निळा** म्हणे ज्ञानेश्वरा । मजही अंगिकारा रंकदीना ॥ ४ ॥

३५६.

माता पिता समर्थ । स्वामी माझा एकनाथ ॥ १ ॥ काळ रुळतो चरणीं । देव घरीं वाहे पाणी ॥ २ ॥ ज्याच्या अनुग्रहें करूनें । जाले पतित पावन ॥ ३ ॥ जो वसे प्रतिष्ठानीं । निळा तया लोटांगणीं ॥ ४ ॥

३५७

तुमचे पाशीं ठेवितां चित्त । पुरला हेत सकळही ॥ १ ॥ बरें वर्म हातां आलें । संतीं दिधलें दाखवोनी ॥ २ ॥ बरवें उच्चारिलें नाम । जिव्हे काम सारुनी ॥ ३ ॥ निळा म्हणे आठव धरिला बरवा सांगितला तो संतीं ॥ ४ ॥

३५८

कोटी जन्म घेइन देवा । करीन सेवा तुमचीच ॥ १ ॥ भुक्ति मुक्ति नका आड । घालूं सांकडें मज वाटे ॥ २ ॥ काय करूं ते आत्मस्थिति । खंडन करिती भजनाचें ॥ ३ ॥ निळा म्हणे राहो ठायीं । विश्वास पायीं तुमाचिये ॥ ४ ॥

३५९

रूप देखितां लोचनीं । राहिलें तें ध्यानीं मनीं ॥ १ ॥ माझिया जीवाचें जीवन । विठ्ठल नामाचें चिंतन ॥ २ ॥ चित्त विगुंतलें पायीं । देहभाव नुरेचि देहीं ॥ ३ ॥ निळा ह्मणे जीवप्राण । तेथेंचि राहिला जडोन ॥ ४ ॥

३६०.

येईल चित्तासी तें करा । तुह्मी आतां विश्वंभरा ॥ १ ॥ आमुचें वांयां गेलें जिणें । नांदा तुम्ही देवपणें ॥ २ ॥ केली आम्ही तोंड-

३६१.

गोड गोड तुमचें नाम । गोड जन्म स्मरणें त्या ॥ १ ॥ गोड वाचा पढतां गीत । गोड चित्त चिंतनें ॥ २ ॥ गोड ध्यान तुमचें मनीं । गोड स्तवनें गुणवाणी ॥ ३ ॥ गोड निळा कीर्तन संगीं । गोड रंगीं नाचतां ॥ ४ ॥

३६२.

ऐशी विठाई माउली । अनाथां कृपेची साउली ॥ १ ॥ उभी असे निरंतर । ठेवूनियां कटीं कर ॥ २ ॥ देउनी प्रेमाचें भातुकें ॥ दासा अवलोकी कौतुकें ॥ ३ ॥ निळा ह्मणे महिमा इचा । वर्णितां कुंठित वेदवाचा ॥ ४ ॥

३६३.

तरले नामें अनेक तरती । वैकुंठा जाती घोषगजरें ॥ १ ॥ ऐसा याचा कीर्ति महिमा । उत्तमा अधमा सरिसाची ॥ २ ॥ कलयुगीं तें सुगमसार । नामोच्चार हरीचा ॥ ३ ॥ निळा म्हणे अनुतापेंसी । गाती वैकुंठासी ते जाती ॥ ४ ॥

३६४.

दामशेटी म्हणे व्यवहार कोणाशीं । केला तो आम्हांसी सांग नाम्या ॥ १ ॥ गणोबा नाईक नाम हें जयाचें । सावकार साचे पुरातन ॥ २ ॥ तयाचे दुकानीं वेंचलें कापड । आठावाडी तोड ऐवजाची ॥ ३ ॥ दामशेटी म्हणे नामया सुजाणा । वेगीं द्रव्य आणा जाउनीयां ॥ ४ ॥

## ३६५.

माझा नामा मज देईं । जीव देईन तुझे पायीं ॥ १ ॥ पुंडलिका भुलविलें । तैसें माझ्या बाळा केलें ॥ २ ॥ तें गा न चले मजपाशीं । देईं माझ्या नामयासी ॥ ३ ॥ तुझ्या संगतीं जे लागले । ते त्वां जिताचि मारिले ॥ ४ ॥ विठ्ठल म्हणे गोणाबाई । आपुला नामा घेउनि जाईं ॥ ५ ॥ हातीं घेउनियां गेली । **गोणाई** तेव्हां आनंदली ॥ ६ ॥

## ३६६.

धरूनियां हातें कर । नामा आणिला सत्वर ॥ १ ॥ सांगे नाना परीच्या गोष्टी । नामा गहिंवरतसे पोटीं ॥ २ ॥ आठवी वेळोवेळां । हृदयीं विठ्ठल सांवळा ॥ ३ ॥ **गोणाई** ह्मणे नामयासी । बा उगा तूं कष्टी होशी ॥ ४ ॥

## ३६७.

आमचे घरधनी उदास त्यांचें चित्त । विठ्ठल विठ्ठल म्हणती रात्रंदिवस ॥ १ ॥ संसार आशा न धरिती मनीं । सदा नामस्मरणीं चित्त त्यांचें ॥ २ ॥ **राजाई** म्हणे देवा करावें आह्मी काय । संसाराची सोय कैशापरी ॥ ३ ॥

## ३६८.

जडजीवातें उद्धरी । ऐशी नामामाजीं थोरी ॥ १ ॥ तें नाम वाचे गातां । हरे जन्ममरण वार्ता ॥ २ ॥ नामें पाषाण तारले । गजेंद्रातें उद्धरिलें ॥ ३ ॥ ऐसा नामाचा पोवाडा । म्हणे नामयाचा **गोंदा** ॥४॥

३६९.

कोणत्या उपायें पावशील आम्हां । कोणता सायास तुम्हां करूं देवा ॥ १ ॥ कालियुगीं नामाचें करावें स्मरण । वेदपुराण खुण सांगताती ॥ २ ॥ तेही शक्ती देवा नाहीं मजलागून । कैसेनी पावन करसी देवा ॥ ३ ॥ काय करूं देवा जळतें हृदय । कृपादृष्टीं पाहे दीनालागीं ॥ ४ ॥ तूंचि कृपावंत होशी हृषीकेशी । येवोनी तारिसी गोंद्यालागीं ॥ ५ ॥

७०.

भाव नाहीं भक्ती नाहीं । प्रेम नाहीं तिळमात्र ॥ १ ॥ तुझ्या नांवें केलें सोंग । अंतरंग संपादी ॥ २ ॥ शांती नाहीं दया नाहीं । नाहीं नाहीं विरक्ती ॥ ३ ॥ ह्मणे विष्णुदास विठा । ब्रीद श्रेष्ठा सांभाळीं ॥ ४ ॥

३७१.

आमुचा बाप आम्हां सांगे । भाक दिधली पांडुरंगें ॥ १ ॥ तुमची पोशीन वंशावळी । करीन तळहात सांउली ॥ २ ॥ तुमचा भार माझे माथां । अणु न विसंबें सर्वथा ॥ ३ ॥ विठा ह्मणे विसरलासी । फुकाचा तूं न बोलसी ॥ ४ ॥

३७२.

काळा आलोट अभंग । हरीचे दास अंतरंग ॥ १ ॥ कृष्णा गोविंदा गोपाळा । पाचारिती वेळोवेळां ॥ २ ॥ कंठी तुळशीच्या माळा । नेत्रीं अश्रूंचिया किळा ॥ ३ ॥ गुढिया रामांकुरीं । कंप स्वेद हे शरीरीं ॥ ४ ॥ अंतर्बाह्य निरंतरीं । मागें पुढें अवघा हरी ॥ ५ ॥ त्याचे चरणींचा रजरेण । नारा नामयाचा जाण ॥ ६ ॥

## ३७३.

अनाथाचा नाथ दीनाचा दयाळ । ह्मणवोनी सांभाळ करीं
ा ॥ १ ॥ तुज ऐसा देव नाहीं त्रिभुवनीं । म्हणवोनी चरणीं
ाटलें ॥ २ ॥ बापा विठ्ठलराया करीं कृपादान । सांभाळीं वचन
पुर्लें तें ॥ ३ ॥ लाडाई म्हणे देवा भेट देईं वेगीं । ब्रीद तुझें
ीं दीननाथा ॥ ४ ॥

## ३७४.

जोडोनियां पाणी करीं विनवणी । धांवें चक्रपाणी पांडुरंगा ॥१॥
गा निरविलें हें नाहीं कळलें । येईं गे विठ्ठले मायबहिणी ॥ २ ॥
ोनियां धांवा धांवला अनंत । शंखचक्रांकित उभा पुढें ॥ ३ ॥
ळुनी मुकुंदा घाली वो सगळा । सांभाळीं विठ्ठला तुझा तूंचि॥४॥
ह्मणे तुझ्या पूर्वजासी भाक । दिधली ती ऐक सांगतों मी ॥५॥
ाची वंशावळी पोषीन मी सत्य । ह्मणोनि कुर्वाळीत पद्मकरें ॥६॥
ी चरणावरीं ठेवियेला माथा । कृपाळु अनंता सांभाळावें ॥ ७ ॥
ानीं धरुनी मूर्ति सबाह्य अंतरीं । आतां या उपरीं देखे काई ॥८॥
ाडाई ह्मणे देवा भेट घेई हृदयांत । देवें मग गुप्त केलें तिसी॥९॥

## ३७५.

रूपहीन सोनें डोळियासी दिसे । तेजही प्रवेशे नेत्रांमाजीं ॥ १ ॥
रूप चोरेटें वोळखीं तूं चित्ता । बुद्धीचा आरुता पैस जेथें ॥२॥
गुण ह्मणो नेदी लक्षातीत वस्तु । जाहला जेथें अस्तु इंद्रियांचा ॥३॥
हिणी म्हणे शब्दीं न सांपडे तरी । शब्द त्या माझारीं अंतर्बाह्य॥४॥

३७६.

हिंगाचिया संगें कापूर नासला । अमृताचा केला नाश मद्यें ॥१
यालागीं भल्याही दुर्जनांचा संग । सांडोनि अव्यंग असावें तें ॥ २
चोराचे संगतीं सांपडे सज्जन । गाईसी बंधन संगतीचें ॥ ३
**बहिणी** ह्मणे मांगा ब्राम्हणांचा संग । दोषाचा विभाग आला तया ॥४

३७७.

अनंताचे गुण अनंत अपार । नकळेचि पार श्रुति शास्त्रां ॥१
तो हा महाराज विटेवरी उभा । लावण्याचा गाभा शोभतसे ॥ २
कटावरी कर ठेवी जगजेठी । पाहे कृपादृष्टीं भक्तांकडे ॥ ३
नामाच्या प्रसंगें आह्मा प्राप्त झालें । **येसाईतें** लाधलें प्रेमसुख ॥४

३७८.

नित्य परमानंद सांवळें सानुलें । पाहतां भुलले योगी जन ॥१
साधनांचें सार योगियांचें ध्यान । मनाचें उन्मन पहातां जया ॥२
सनकादिक ध्याती शिवादि वंदिती । तो ध्यावा चित्तीं **येसाई** ह्मणे॥३

३७९.

तुजवीण मज कोणी नाहीं देवा । कृपाळु केशवा मायबापा ॥१
अनाथा कुत्रासा होसी जगदानी । तें त्वां चक्रपाणी सांभाळावें ॥२
पतित तारिले पापी उद्धरीले । मज कां अव्हेरिलें दीननाथा ॥ ३
आमुच्या गुणदोषा पाहतां नाहीं अंत।**साखराई** विनवीत नामयाची॥४

३८०

पतितपावना अगा नारायणा । करुणा वचना चित्त द्यावें ॥१॥
आमुचा स्वामी आम्ही तुझे रंक। आपुली ती भाक सांभाळावी ॥२

हीन दीन पापी नकळे आचरण । धारल चरण दृढ जोवीं ॥ ३ ॥
**साकराई** विनवोनी घाली लोटांगण । वंदित चरण वारंवार ॥ ४ ॥

३८१.

अणुमाजी राम रेणुमाजी राम । तृणकाष्ठीं राम वर्तताहे ॥ १ ॥
बाहीजु भीतरीं राम चराचरीं । विश्वीं विश्वाकारीं व्यापलासे ॥ २ ॥
रामेंविणें स्थळ रितेंचि पैं नाहीं । वर्ते सर्वां ठायीं रामराम ॥ ३ ॥
**परिसाभागवत** कायावाचामनें । श्रीरामावांचून आन नेणे ॥ ४ ॥

३८२.

उठोनी प्रात:काळीं येतीं कृष्णाजवळी । पाहती नेत्रकमळीं कृष्ण-मुख ॥ १ ॥ धन्य दिवस जाहला श्रीकृष्ण भेटला । गोकुळीं उगवला बाळसूर्य ॥ २ ॥ दृष्टीचेनि सुखें सुखाचि कोंदाटे । अंतरीं प्रगटे तरी का उणें ॥ ३ ॥ **जोगा** म्हणे तेणें परमानंदीं काज । गोकुळीं हें निज प्रगटलें ॥ ४ ॥

३८३.

कृष्णाचें रूपडें डोंगर झाले निळे । गोपाळ सांवळे दिसताती ॥ १ ॥
आनंदें मयोर करिताती किंकार । देखोनि सुंदर चक्रपाणी ॥ २ ॥
रूपाचेनि रूपें धारितो गोधनीं । कैवल्याचा दानीं पाहताती ॥ ३ ॥
**जोगयाचा** स्वामी कृष्णरूप देखोनि । श्वापदा लोचनीं प्रेम वाहे ॥ ४ ॥

३८४.

शरीर विनटलें सेवे तुझें । ध्यानीं रंगलें मन माझें ॥ १ ॥ शिर विकलें चरणासी । वाचा तुझिया नामासी ॥ २ ॥ ऐकें पंढरपुर-वासी । नयन तुझिया रूपासी ॥ ३ ॥ परिचर्या दंडपाणी । देह लोटीये धरणीं ॥ ४ ॥ श्रवण कीर्तन गोविंदा । तुळसी प्राण मक-

रंदा ॥ ५ ॥ चरणीं जेउतें चालणें । तेउती भेटी नारायणें ॥६॥ **वत्सरा** म्हणे संतसंगीं । कांहींच नुरे पापा लागी ॥ ७ ॥

३८५.

जें बळीनें यागीं पूजिलें । जें तिही लोकीं विस्तारलें ॥ जें चतुराननें अर्घ्यें केलें । ध्वज वज्रांकुश ॥ १ ॥ तुझिया पाउलां शरण । जे सर्व भावें भवभंजन ॥ ध्रु० ॥ जें धांविन्नलें गजालागीं । यशोदा धरिलें वोसंगीं ॥ जें उमटलें शकटाभंगीं । बाळसूर्यापरी कोंवळें ॥ २ ॥ जें कमळें मनोहरे । अतिलावण्यें साजिरें ॥ जें धरिलें निरंतर । हृदयकमळीं ॥ ३ ॥ जें उमटलें गोवर्धनीं । अघासुराच्या वदनीं ॥ जें सेविले गोपांगनीं । अगा नंदनंदना ॥४ ॥ जें अहिल्याश्रममोचन । जें दंडकवनपावन ॥ जेथें रंगले मुनिजन । अगा राया रघुपती ॥ ५ ॥ जें लवणासुर मुक्तकर । आश्रम गंगेचें मनोहर ॥ जेथें रंगले योगीश्वर । सुरवरांसहित ॥ ६ ॥ जें काळयाचे फडांवरी। ठेविलें होतें गा मुरारी । **वत्सरा** ह्मणे गा श्रीहरी । क्षणभरी ना विसंबें ॥ ७ ॥

३८६.

पतितपावन ब्रीद बांधिलें आधीं । तरी कां उपाधी भक्तापाठीं ॥ १ ॥ तुझें म्हणविल्या दुजा अंगसंग । उणेंपण सांग कोणाकडे ॥ २ ॥ सिंहाचें भातुकें जंबुकें नेतां । थोराचिये माथां लाज लागे ॥३॥ **कान्होपात्रे**चा देह तव जाण । रक्षावा आपण ब्रीदासाठीं ॥४॥

३८७.

शांति आणि क्षमा हे तुमचे उपाय । दंभ प्रपंचभय निवारावें ॥ १ ॥ ज्ञानवैराग्यश्रद्धायुक्त हें भजन । होंचि मज प्रमाण देईं देवा

॥ २ ॥ विनवी **पात्रा कान्हो** अहो दीननाथा। चरणीं असो माथा सर्वकाळ ॥ ३ ॥

## ३८८.

न लगे भुक्ति मुक्ति न लगे स्वर्गवास । नको जाणें वैकुंठास देवराया ॥ १ ॥ न लगे योगयाग अष्टांगसाधन । न चुके बंधन येणें कांहीं ॥ २ ॥ न लगे इष्टमित्र सोईरे संबंधी । नको हे उपाधी पाठी लावूं ॥ ३ ॥ **कान्होपात्रा** ह्मणे विठोबा दयाळा । दे गा प्रेमकळा नाम तुझें ॥ ४ ॥

## ३८९.

आपुल्या निढळीं लिहिलीं अक्षरें । तुम्हा खोटें खरें कोण म्हणे ॥ १ ॥ बायांच म्यां देवा धरिली आवडी । न पावे जोडी कांहीं केल्या ॥ २ ॥ आतां पंढरीनाथा नका पाहूं अंत । आला तो आघात निवारावा ॥ ३ ॥ म्हणोनी **कान्होपात्रा** येत लोटांगणी । वारंवार विनवणी करीतसे ॥ ४ ॥

## ३९०.

वाचे ह्मणतां निवृत्ति । अवघी नीरसली भ्रांती ॥ १ ॥ हें तों माझ्या अनुभवा । आलें जीवा प्रत्यया ॥ २ ॥ गुंतलों होतों मोह आशा । स्मरणें नाश पावलों ॥ ३ ॥ ऐसा अनुभव नामाचा । **सेना न्हावी** स्मरे वाचा ॥ ४ ॥

## ३९१

सदाशिवाचा अवतार । स्वामी निवृत्ती दातार ॥ १ ॥ तया माझा नमस्कार । वारंवार निरंतर ॥ २ ॥ पुढें शोभे कैलास राणा ।

मार्गे गंगा ओघ जाणा ॥ ३ ॥ **सेना** घाली लोटांगण । वंदी निवृत्तिचरण ॥ ४ ॥

## ३९२.

श्रीज्ञानराजें केला उपकार । मार्ग हा निर्धार दाखविला ॥ १ ॥ विटेवरी उभा वैकुंठनायक । आणि पुंडलीक चंद्रभागा ॥ २ ॥ अविनाश पंढरी भूमीवरी पेठ। प्रत्यक्ष वैकुंठ दाखविलें ॥ ३ ॥ **सेना** म्हणे चला जाऊं तया ठाया । पांडुरंगा सखया भेटावया ॥ ४ ॥

## ३९३.

आजी सोनियाचा दिवस । दृष्टी देखिलें संतांस ॥ १ ॥ जीवा सुख थोर जाहलें । माझें माहेर भेटलें ॥ २ ॥ अवघा निरसला शीण । संतचरण देखतां ॥ ३ ॥ आजी दिवाळी दसरा । **सेना** म्हणे आले घरा ॥ ४ ॥

## ३९४.

नाम हें अमृत भक्तांसी दिधलें । ठेवणें ठेविलें होतें गुप्त ॥ १ ॥ प्रत्यक्ष अवतार धरिला अळंकापुरीं । मार्ग हा निर्धारीं दाखविला॥२॥ कृतयुगामाजी वसिष्ठ जाणता । नाम जपती तत्त्वतां नारदादि ॥३॥ कलियुगामाजीं न घडे साधन । जातील बुडोन महाडोहीं ॥ ४ ॥ रामकृष्णहरि गोविंद गोपाळ । स्मरा वेळोवेळ **सेना** ह्मणे ॥ ५ ॥

## ३९५.

घेतां नाम विठोबाचें । पर्वत जळती पापाचे ॥ १ ॥ ऐसा नामाचा महिमा । वेद शिणला जाहली सीमा ॥ २ ॥ नामें तारिले अपार । महापापी दुराचार ॥ ३ ॥ वाला कोळी ब्रह्महत्यारी । नामें तरला निर्धारीं ॥४॥ **सेना** बैसोनि निवांत । विठ्ठल नाम उच्चारित॥४॥

३९६.

देहीं देखिली पंढरी । आत्मा अविनाश विटेवरी ॥ १ ॥ तो हा पांडुरंग जाणा । शांति रुक्मिणी निजांगना ॥ २ ॥ आकारलें तितुकें नासे । आत्मा अविनाश विठ्ठल असे ॥ ३ ॥ ऐसा विठ्ठल हृदयीं ध्याई । **चोखामेळा** जडला पायीं ॥ ४ ॥

३९७.

पांडुरंगीं लागो मन । कोण चिंतन करी ऐसें ॥ १ ॥ देहभाव विसरला । देव गेला बुडोनि ॥ २ ॥ जीव उपाधी भक्ति वंद्य । तेथें भेद जन्मला ॥ ३ ॥ मुळींचा **चोखामेळ** नाहीं । कैंचा राही विटाळ ॥ ४ ॥

३९८.

विठोबा पाहुणा आला आमुचे घरा । निंब लोण करा जीवे भावें ॥ १ ॥ पंचप्राण ज्योती उजळोनि आरती । वोवाळिला पति रखुमाईचा ॥ २ ॥ षड्रस पक्वान्नें विस्तारिलें ताट । जेऊं एकवट **चोखा** ह्मणे ॥ ३ ॥

३९९.

यातीहीन मज म्हणती देवा । नेणें करूं तुमची सेवा ॥ १ ॥ आम्हा नीचांचें तें काम । वाचे गावें सदां नाम ॥ २ ॥ उच्छिष्टाचे आस । संतदासाचा मी दास ॥ ३ ॥ **चोखा** म्हणे नारायणा । पदरीं घेतलें मज दीना ॥ ४ ॥

४००

माय तूं माउली अनाथाची देवा । धांवें देवरावा त्वरित हे ॥ १ ॥ पतितपावन गाजे त्रिभुवनीं । भक्त शिरोमणी तुम्ही देवा ॥ २ ॥ अना

चें धांवणें करणें चक्रपाणी । सकळां मुकुटमणी विठला तूं ॥ ३ ॥
त अव्हेरितां कोण म्हणेल थोरी । म्हणतसे माहारी **चोखियाची**
४॥

## ४०१.

*शीण वाटतसे मना । नारायणा न पाहातां ॥ १ ॥ वायां आचार
चार । सदा मळीन अंतर ॥ २ ॥ सोंगाचें तें सोंग । दावी रंग कथेचा
। ३ ॥ परधनीं सदां मन । वरी दावितसे डोलून ॥ ४ ॥ ऐसे नर ते
राचारी । म्हणे **चोखियाची** माहारी ॥ ५ ॥

## ४०२.

पांडुरंगावांचुनी दुजा कोण सखा । निर्वाणीचा देखा मायबाप
॥१ ॥ तारीतसे एका नामासाठीं जगा । ऐसा हा पैं गा श्रेष्ठाचार ॥२॥
गणिका गजेंद्र यांसी उद्धरिलें । प्रत्यक्ष तारिलें अजामेळा ॥ ३ ॥ **वंका**
**म्हणे** ऐसा आहे भरंवसा । मज तव सर्वेशा विठोबाचा ॥ ४ ॥

## ४०३.

भक्तासाठीं रूपें धरी । त्याचें काम अंगें करी ॥ १ ॥ आला पुंड-
लीकासाठीं । अकस्मात जगजेठी ॥ २ ॥ अनंत ब्रह्मांडें रचिलीं । नाना
परी क्रीडा केली ॥ ३ ॥ हें तंव न कळे कोणासी । **जगमित्रनागा**
ध्याय मानसीं ॥ ४ ॥

## ४०४.

सकळ भूषणांचें भूषण । कंठीं धरा नारायण ॥ १ ॥ तेणें
तुटती यातना । चुकसी यमाच्या पतना ॥२॥ शिव मस्तकीं धरिला ।
भेद भक्तांचा काढिला ॥ ३ ॥ अवघ्या देवांचें हें ध्यान । **जगमित्र-**
**नागा** वंदी चरण ॥ ४ ॥

## ४०५.

माझें प्रेम तुझे पायीं । राहो ऐसें करी कांहीं ॥ १ ॥ मागणें हेंचि प्राणें । आणिका न लागों छंदासी ॥ २ ॥ काया वाचा आ मन । केलें समर्पण तव चरणीं ॥ ३ ॥ हाचि माझा निर्धार । ह नरहरी सोनार ॥ ४ ॥

## ४०६.

कटीं दोनी कर दिव्य तें रूपडें । सनकादिक वेडे जयासाठीं ॥ १ तें हें बाळरूप उभें चंद्रभागे तीरीं । चतुर्भुज हरी शोभतसे ॥ २ वैजयंती माळा किरीटकुंडलें । हृदय शोभलें द्विजपदें ॥ ३ ॥ क पीतांबर शोभत मेखळा । ध्यानीं लक्षी त्याला नरहरी ॥ ४ ॥

## ४०७.

शिव आणि विष्णू एकचि प्रतिमा । ऐसा ज्याचा प्रेमा सदे दित ॥ १ ॥ धन्य ते संसारीं नर आणि नारी । वाचे हरहरि उच्च रित ॥ २ ॥ नाहीं पैं भेद अवघा मनीं अभेद । द्वेषाद्वेषसंव उरी नुरे ॥ ३ ॥ सोनार नरहरी न देखे द्वैत ॥ अवघा मूर्तिम एकरूप ॥ ४ ॥

## ४०८.

आमुचा आम्हांसी सांपडला ठेवा । वडिलीं देवाधिदेवा सां येलें ॥ १ ॥ तो मीं न सोडीं वाहतों तुझी आण । गेलियाही प्रा जीव माझा ॥ २ ॥ मज तो भरंवसा आहे दृढ मनीं । कां चक्रपा झकाविसी ॥ ३ ॥ नामयाचा महादा बोलतसे बोला । अवघा भर विठ्ठल मागें पुढें ॥ ४ ॥

## ४०९.

ढरींचें सुख पाहतां अलोकिक । वैकुंठनायक उभा जेथें ॥१॥ जें दुर्लभ भक्तांसी सुलभ । रुक्मिणीवल्लभ उभा विटे ॥ २ ॥ ांचा मेळ करिती गदारोळ । त्यांमाजी गोपाळ प्रेमें ॥ ३ ॥ जिकडे पाहे तिकडे होत ब्रम्हानंद । भानुदास करी ़नामोच्चार ॥ ४ ॥

## ४१०

ान्यधन्य हें नगर । भूवैकुंठ पंढरपूर ॥ १ ॥ धन्य धन्य चंद्र- । मध्यें पुंडलीक उभा ॥ २ ॥ धन्य धन्य वेणुनाद । क्रीडा ो गोविंद ॥ ३ ॥ धन्य पद्माळयाची पाळी । गाई चारी वन- ॥ ४ ॥ धन्य पंढरीचा वास । देवा गाये भानुदास ॥ ५ ॥

## ४११.

न मागतां कांहीं न करितां सेवा । आलासी गा देवा पंढरिये॥१॥ ायबाप विश्वासी तारक । तुवां पुंडलीक सुखी केला ॥ २ ॥ तां गोधनें आलास बा पायीं । पुंडलीक कांहीं न बोलेचि ॥३॥ ायाचा दीप साक्षित्वासी आला । भानुदास त्याला नाम जाहलें ? ॥

## ४१२.

विठ्ठल नाम घेतां वाचे । जाहलें जन्माचें सार्थक ॥ १ ॥ तो हा विठेवरी । पाउलें समचि साजिरीं ॥ २ ॥ जनी म्हणे कृपा- । वाट भक्तांची पाहत ॥ ३ ॥

## ४१३.

कृपावंता दया मोठी । आदर पोटीं भक्ताचा ॥ १ ॥ मी तों दीन यातीहीन । करा पालन जवळीच ॥ २ ॥ जनी ह्मणे दया-घना । विज्ञापना ही माझी ॥ ३ ॥

## ४१४.

कटावरी ठेविले कर । रूप सांवळें सुंदर ॥ १ ॥ शोभे वैजयं-यती माळ । कौस्तुभ झल्लाळ शोभती ॥ २ ॥ जनी म्हणे चरण विटे । दिसे गोमटें साजिरें ॥ ३ ॥

## ४१५.

जन्मोजन्म देईं हरी । दासी नाम्याची मी खरी ॥ १ ॥ भोळा माझा नामदेव । त्यासी तुम्हीं सांभाळावं ॥ २ ॥ हीच माझी विन-वणी । मस्तक ठेविला चरणीं ॥ ३ ॥ ऐसे बोलोनियां निघे । पर-तोनी पाहे मागें ॥ ४ ॥ जनी म्हणे ब्राह्मणांला । तुम्हां उशीर बहु जाहला ॥ ५ ॥

## ४१६.

कां गा नयेसी विठ्ठला । ऐसा कोण दोष मला ॥ १ ॥ मायबाप तूंचि धनी । मज सांभाळीं निर्वाणीं ॥ २ ॥ त्वां बा उद्धरिले थोर । तेथें किती मी पामर ॥ ३ ॥ दीननाथ दीनबंधु । जनी म्हणे कृपासिंधु ॥ ४ ॥

## ४१७.

चला पंढरीसी जाऊं । रखुमादेवीवरा पाहूं ॥ १ ॥ डोळे निव-तील कान । मना तेथें समाधान ॥ २ ॥ स्नान करूं भिवरेसी ।

ठीक पायापाशीं ॥ ३ ॥ डोळे भरूनि पाहूं देवा । तेणें विसरूं नावा ॥ ४ ॥ ऐसा निश्चय करुनी । ह्मणे नामयाची जनी ॥५॥

४१८.

मग म्हणती नंदाला । पुत्रमुख पाहूं चला ॥ १ ॥ स्नान घालुनां त्यासी । वस्त्र दिलें ब्राह्मणासी ॥ २ ॥ परब्रह्म तें पाहुनी । ीं मिळे दासी जनी ॥ ३ ॥

४१९.

सुखें संसार करावा । माजी विठ्ठल आठवावा ॥ १ ॥ असोनियां ों । छाया पुरुष जैसा पाहीं ॥ २ ॥ सूर्य जैसा घटिकेसी । तैसी ीं जनी दासी ॥ ३ ॥

४२०.

कैसी समचरणाची शोभा । अवघा जगीं विठ्ठल उभा ॥ १ ॥ णें विठ्ठलें लाविलें पिसें । जिकडे पाहें तिकडे दिसे ॥ २ ॥ पाहतें हाणीया माझारीं । पाहतें गेलें पाहण्यावरी ॥ ३ ॥ ॥ ३ ॥ एका- नार्दनीं एकूं । विठ्ठल अवलोकीं लोकु ॥ ४ ॥

४२१.

पाहूं जातां नारायणा । पाहतां मुकिजे आपणा ॥ १ ॥ ऐसा टीचा नवलावो । पाहतां तुरे भक्त देवो ॥ २ ॥ पाहतां नाठवेचि जें । तेंचि होइजे सहजें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भेटी । जन्म रणा होय तुटी ॥ ४ ॥

४२२.

गाऊं नाचूं परमानंदें । रामानामाचेनी छंदें ॥ १ ॥ म्हणा जय- राम श्रीराम । भवसिंधु तारक नाम ॥ २ ॥ राम नामाची आवडी ।

काळ गेला देशोधडी ॥ ३ ॥ आवडीनें नाम घोका । म्हणे जनार्दन एका ॥ ४ ॥

## ४२३.

नाम घेतां रूप आठवलें सांवळें । ही खुण गोपाळें द्यावी मज॥१॥ येणें जन्म कृष्ण दाटोनी टाकणें । आडवस्ती पेणें चुकविली ॥ २ ॥ चुकविली वस्ती एका जनार्दनीं । संसारसांडणी सांडोनियां ॥३॥

## ४२४.

आंबेकेळ द्राक्ष घट्ट । अवघें नामापुढें कडू ॥ १ ॥ नाम गोड नाम गोड । हरि म्हणतां पुरे कोड ॥ २ ॥ गूळ साखर कायसी निकी । अमृताची चव जाहली फिकी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं घडली मिठी । चव घेतलिया कधींच न तुटी ॥ ३ ॥

## ४२५.

ज्ञान वैराग्य कावड खांदीं । शांतीजीवन तयांमधीं ॥ १ ॥ शिवनाम तुम्ही ध्या रे । शिवस्मरणीं तुम्ही रहा रे ॥२॥ हरिहर कावड घेतली खांदी । भोंवतीं शोभे संतमांदी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कावडी बरी । भक्ती फरारा तयावरी ॥ ४ ॥

## ४२६.

अखंड वाचे नाम । तया न बाधी क्रोध काम ॥१ ॥ रामनाम वदतां वाचे । ब्रम्हसुख तेथें नाचे ॥ २ ॥ रामनामें वाजे टाळी । महादोषां होय होळी ॥ ३ ॥ दोन अक्षरां पैं साठीं । ब्रम्ह धांवे पाठोपाठीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं नाम । सहज चैतन्य निष्काम ॥५॥

४२७

राम म्हणोनि दीन येती काकुलती । त्याचे यातनेचे दोष सांगावे किती ॥ १ ॥ काय तें साच न कळे पाप । नामें निष्पाप महादोषी ॥ २ ॥ चित्रगुप्त जंत्र पाहे वही । कोरडें पान रेघही नाहीं ॥ ३ ॥ खोडी ना मोडी समूळ उडे । **एकाजनार्दनीं** नामें पाप झडे ॥ ४ ॥

४२८.

मनासी खोचिलें मायेसी मोकलिलें । तें शस्त्र आपुलें सज्ज करी ॥ १ ॥ यापरी सैरा होय कां बारणीं । माया ममता दोन्ही मारुनियां ॥ २ ॥ जागृती स्वप्न निवटिलें पाहे । सुषुप्ती सळियली सुखाचे घायें ॥ ३ ॥ **एकाजनार्दनीं** मांडियलें खळें । धुरची जिंतिली अंगींचेनी बळें ॥ ४ ॥

अभंग. ४२९.

दृष्टीचें अग्र शून्याचें तें सार । तेंचि दशम द्वार पाहीं बापा ॥१॥ तथें मधुकर नित्य खेळे आतां । सूक्ष्म पाहतां अतिलीन ॥ २ ॥ लीन होऊनियां मुंगिचीये परी । जिताचि ओवरी प्रासियेली ॥ ३ ॥ म्हणे **मुकुंदराज** अवघाचि गोविंद । गो नामें तो शब्द लीन तेथें ॥ ४ ॥

४३०

पवित्र शीतळ जळ । माथां मंदाकिनी । कंठीं धरियला वन्ही । नवल काय ॥ ध्रु० ॥ गरुडारूढ मधुसूदन । हृदयीं वसिजे पूर्ण । कंठीं सर्पाभरण । नवल काय ॥ १ ॥ सिंहावरी ओळंगत । अंकीं गिरिजा स्वस्थ । मारिला कुंजर दैत्य । नवल काय ॥ २ ॥ अहो

लीलाविश्वंभरा । कृपामूर्ति जगदोद्धारा । तारिसी **मुक्तेश्वरा** । नवल काय ॥ ३ ॥

## ४३१.

तुझाचि खातसें भात । तुझेंचि गातसें संगीत । तुजची अर्पेल चित्त । पंढरीराया ॥१॥ सर्वही सोडुनी आस । धरियेली तुझी कास । ठाव नाहीं मीपणास । पंढरीराया ॥ २ ॥ कृष्णदास **जयराम** । तुवांचि ठेविलें नाम । नामें पूर्ण काम । पंढरीराया ॥३॥

## ४३२

स्वयें ब्रह्म असोन मी देह म्हणती । त्रिगुणाची भ्रांति अविद्ये पडली ॥ १ ॥ साधुसंग धरा अंतर शुद्ध करा । कल्पना मन मुरा ज्ञानविवेकें ॥ २ ॥ तरंग साकारे उदकाचेनि अंगें । तैसीं मनुष्य सोंगें परब्रह्मीं ॥ ३ ॥ सुवर्णाचे नग भांडार हीण डांके । तेंवि ब्रम्ह निकें देहकल्पनेवीण ॥ ४ ॥ देहकल्पना विज्ञानें जाळिली । वैराग्य पुरीं घातली **शेख महमदें** ॥ ५ ॥

## ४३३.

दाढी डोई भादरिती । केंस मागुते निघती ॥ १ ॥ शुचिष्मंत जाला कैसा । विवेक पाहाना कां ऐसा ॥ २ ॥ देवासाठीं तीर्था जाती । तरि कां मागुते फिरती ॥ ३ ॥ **देविदास** ह्मणे भ्रम । ज्ञानेवीण अवघा श्रम ॥ ४ ॥

## ४३४.

बाळ्या भोळ्या जना उपाय हा सोपा । मन्मथाच्या बापा शरण जावें ॥ १ ॥ सर्वस्वें आपुला भार त्याच्या माथां । घालोनियां व्यथा ओसरावी ॥ २ ॥ अहंतेचा नाश सर्वस्वीं करावा । कृष्ण ओळखा

सवा ठायीं ॥ ३ ॥ जैसें जैसें घडे संतोष सांकडें । तें तें देवाकडे समर्पावें ॥ ४ ॥ असत्य दांभिक सांडावी कामना । निंदा द्वेष मना नातळावीं ॥५॥ पोटाप्रावरणाची चिंता नाठवावी । प्रारब्धाचे गांवीं सर्व आहे ॥ ६ ॥ भोगावें सर्वही प्रारब्धाचें फळ । करावें अढळ अंतरासी ॥ ७ ॥ वैराग्याच्या बळें असावें उदास । कोण्या वैभवास भुलूं नये ॥ ८ ॥ स्वधर्मीं वर्ततां लज्जा ओसरावी । अधर्मीं धरावी लज्जा थोर ॥ ९॥ सर्वां ठायीं नाम गोविंदाचें घ्यावें । अंतरीं धरावें विरक्तीसी ॥ १० ॥ **दयार्णवा**माजी जातां याचि वाटे । अकस्मात भेटे स्वानंदासी ॥ ११ ॥

## ४३५.

हरि होउनि हरिगुण गावे । तेणें आपण उद्धरावें ॥ १ ॥ अवघा बोले चाले हरी । ज्याची कथा तोचि करी ॥ २ ॥ होउनियां श्रोता वक्ता । करी आपुली आपण कथा ॥ ३ ॥ विश्वव्यापक परिपूर्ण । अवघा एकचि नारायण ॥ ४ ॥ कैंचा **रमावल्लभदास** । अवघा हरीचा उल्हास ॥ ५ ॥

## ४३६.

निर्गुण निधर्म निर्विकार रूप । केवळ अरूप परब्रह्म ॥१॥ ऐशिया स्वरूपीं मूळमाया झाली । गुणमाया आली तिच्या पोटीं ॥२॥ गुणमायेपोटीं होय सत्व गुण । सत्वें रजोगुण उद्भवला ॥ ३ ॥ रजापासोनियां तमोगुण होय । म्हणे **पूर्ण** सोय ऐका पुढें ॥ ४ ॥

## ४३७.

तमोगुणीं व्योम जाहलें उत्पन्न । व्योमीं प्रभंजन प्रसवला ॥१॥ प्रभंजनापोटीं तेज प्रसवलें । तेज तेंही व्यालें आपालागीं ॥२॥ आपा-

चिये पोटीं भूमि उपजली । ऐशीं विस्तारलीं पंचभूतें ॥ ३ ॥ अष्टधा प्रकृति झाली ऐशापरी । पूर्ण म्हणे थोरी ऐका पुढें ॥४॥

४३८.

देव पाहूं जातां अवघा भरला असे । दृष्टीसी न दिसे कदाकाळीं ॥ १ ॥ भेटी घेऊं जातां भेटी नाहीं तुटी । अवघा जगजेठी सांठविला ॥ २॥ भिंतीवरील चित्रें भेटवा म्हणे भिंती । परी नाहीं भिंतीवेगळींच ॥ ३ ॥ स्थावर जंगमीं व्यापोनि राहिला । अवघा विस्तारला सृष्टीरूप ॥४॥ हरि म्हणे ऐसें शिवरामें केलें । स्वरूप दाखविलें माझें मज ॥ ५ ॥

४३९.

उपेक्षितां माये कोठें जावें तान्हें । सांगावें गाऱ्हाणें कोणापाशीं ॥ १ ॥ पितयानें कन्या विकिली वृद्धासी । आडवा तयासी न ये कोणी ॥ २ ॥ रायें लुटविलें आपुलें नगर । वर्जिता साचार नाहीं कोणी ॥ ३ ॥ तैसे देवा तुम्ही मोकलिल्यावरी । आमुचा कैवारी कोण आहे ॥४॥ महिपती म्हणे करिं तो विचार । सत्कीर्ति साचार वाढे जेणें ॥ ४ ॥

४४०.

आंधळ्याची काठी देव नारायण । चालवी मज कोण स्वामीराया ॥ १ ॥ अपंग अनाथ म्हणवितों तुझा । ब्रिदाचिया लाजा पुरीं मज ॥ २ ॥ चिडी मुंगी पक्षी अवघ्यांचा तूं दाता । नगाचीहि चिंता असं द्यावी ॥ ३ ॥

### ४४१.

राम नाम वेदोवाणी । मना झाली समाधानी ॥ १ ॥ ह्मणतां राम वेळोवेळां । जळती पापें अग्निज्वाळा ॥ २ ॥ रामनामाचा प्रताप । काय पुढें येइल पाप ॥ ३ ॥ शिवदास म्हणे नाम । आम्ही हेंचि केलें काम ॥ ४ ॥

### ४४२.

न दिसे संसार अवघेंचि ब्रह्म । सांडीं माया भ्रम विषयांचा ॥१॥ तरंग समुद्रीं जैशा जल-लहरी । विरालिया तरी सिंधु होय॥२॥ब्रह्मापासोनियां विश्व अवघें जालें । ब्रह्मींच मिळालें ब्रम्हपणीं ॥३॥ आपणचि एक दुजा नाहीं कोणी । अवघा जनीं वनीं एक आत्मा ॥४॥ आपणचि विश्व आपणचि ब्रह्म । हरि म्हणे वर्म कळलिया ॥५॥

### ४४३.

चित्तीं धरिली वासना । सिद्धी न्यावी नारायणा ॥ १ ॥ मी तों अपंग अनाथ । तुम्ही अनाथाचे नाथ ॥ २ ॥ केला पण सिद्धी न्यावा । मज सांभाळावें देवा ॥३॥ महीपति निढळवाणा । त्याची येऊं द्या करुणा ॥ ४ ४

### ४४४.

पायीं ठेवितां कपाळ । नयनीं वाहे प्रेमजळ ॥ १ ॥ तेणें चरण प्रक्षाळिले । अंगीं रोमांच ऊठिले ॥ २ ॥ मनीं मनचि विरालें । चंद्रामृत तें चांगलें ॥ ३ ॥ तेंचि घेऊनियां करीं । मुखप्रक्षालन करीं ॥ ४ ॥ धूप संशय जाळिला । ज्ञानदीप उजळिला ॥ ५ ॥ [illegible] नैवेद्य साखर । भक्षीं नवनीत सार ॥६॥ भक्त प्रसाद सेविती ।

गाती आनंदें नाचती ॥ ७ ॥ शिवगुरु ज्ञानाचा सागर । बोले अवधूत जयजयकार ॥ ८ ॥

४४५.

उदकमय झालें जरी महीतळ । घेईजे तें जळ आर्तीजोगें ॥१॥
तैसा वेद सर्व उपाय बोलिला । अधिकार मानला तोचि कीजे ॥२॥
सूर्याचेनि उदयें बहु मार्ग दीसती । परि कार्यपंथीं चालिजे गा ॥३॥
लाधलिया ज्ञान वेदोक्त साधनें । केलीं सर्व तेणें निश्चयेंसी ॥ ४ ॥
जीवन्मुक्त ज्ञानी निजबोध सेवुनी । कृतकृत्य होउनी सुखी ठेला॥५॥

४४६.

देव तोचि संत संत तोच देव । येथें दुजा भाव नाहीं कांहीं ॥१॥
देव नाम त्याचें संत नाम त्याचें । परब्रह्म साचें एकाचि तें ॥ २ ॥
कोणी म्हणती देव कोणी ह्मणती संत । परि ते भावातीत परब्रह्म ॥३॥
संताचे चरण सेवि नारायण । देव निरंजन संताचि तो ॥ ४ ॥

४४७.

नको विसरूं तूं येईं आतां वेगें । चरण दावीं गे रामाबाई ॥१॥
चरणदर्शनासी लागलीसे क्षुधा । तेणें थोर बाधा पावतसें ॥ २ ॥
अंतरींचें दुःख सांगूं कोणापाशीं । तूं एक जाणसी रामराया ॥ ३ ॥
कोण या दुःखाची करील निवृत्ति । रामा रघुपति तुजवीण ॥ ४ ॥
राघवा मी तुझ्या दर्शनावांचून । जालों फार दीन रामराया ॥ ५ ॥
दर्शन भाषण तुझें हें घडेल । तेव्हां तें होईल सुख मज ॥ ६ ॥
मासोळी ही जैशी जीवनावांचून । तैसा तुजवीण व्याकुळ मी ॥ ७ ॥
सत्य मिथ्या रामा जाणसी अंतरीं । व्यर्थ मी मुरारी काय बोलूं॥८॥

कोटी ब्रह्महत्या पातक घडेल । प्रिय हें असेल अन्य जरी ॥ १० ॥
आत्मया श्रीरामा तूंचि मला प्रिय । सर्वेही अप्रिय तुजवीण ॥११॥
तुझ्या दर्शनाची तृषा लागतसे । आणिक हें नसे प्रिय मज ॥१२॥
आतां किती माझा पाहशील अंत । दयाळू बहुत राघवा तूं ॥१३॥
**मौनी** म्हणे तुझें रूप हें सगुण । दाखवीं भाषण करीं मज ॥१४॥

## ४४८.

देव जोडे ऐसा कांहीं । करा उपाय तो देहीं ॥ १ ॥ नका जाऊं अभिमानें । क्षणभंगुर हें जिणें ॥ २ ॥ माप लागलें शरीरा । अंतीं काळ ग्रासिल खरा ॥ ३ ॥ म्हणे **हरिनारायण** । जोडी जोडा निजधन ॥ ४ ॥

## ४४९

जो जो करूं जावा संग । तो तो होतो मनोभंग ॥ १ ॥ विषय नामाची संगती । पदोपदीं ही फजिती ॥२॥ तळमळ चिंता गाढी । चित्तीं संशयाची आढी ॥ ३ ॥ **जयराम** उमजला । विठ्ठल गुरु सखा केला ॥ ४ ॥

## ४५०

अहो वेदव्यास गुरु । तुम्हा माझा नमस्कारू ॥१॥ माझें कल्याण करावें । मज दासपद द्यावें ॥ २ ॥ अहो आनंदनिधाना । कृष्ण-मूर्ति नारायणा ॥ ३ ॥ **ज्योती** म्हणे दीनोद्धारा । कृपासिंधू जी दातारा ॥ ४ ॥

## ४५१.

चित्तीं वासना घडामोड । स्नानसंध्या गडबड ॥ १ ॥ पुण्याचार दाउनि जनीं । परविषयां होय धनी ॥ २ ॥ करुनी भिक्षुकीचा

धंदा । लोकां म्हणे आम्हां वंदा ॥ ३ ॥ स्वयें अमंगळ निष्ठुर । परबोधनीं तत्पर ॥ ४ ॥ **वामन** म्हणे ऐशा संता । संग नको भगवंता ॥ ५ ॥

## ४५२.

जन्मतां शरीर न जन्मो आपण । ऐसें जाणती पूर्ण तेची योगी ॥१॥ वाढतां शरीर न वाढे आपण । ऐसें जाणती पूर्ण तोचि योगी ॥२॥ मरतां शरीर न मरे आपण । ऐसें जाणे पूर्ण तोचि योगी ॥ ३ ॥ देशें काळेंवीण माझा मी आपण । ऐसें जाणे पूर्ण तोची योगी ॥ ४ ॥ **केशव** ह्मणे सहजीं सहज मी आपण । ऐसें जाणे पूर्ण तोची योगी ॥ ५ ॥

## ४५३.

करुणा भाकितसें मनीं । वाट पाहें निशिदिनीं ॥ १ ॥ कां बा झालासी निष्ठुर । माझें खोटें जन्मांतर ॥२॥ ऐसें होतें तुझे पोटीं । अभय द्यावें कशासाठीं ॥ ३ ॥ चिंदंबरा पुरवीं आस । खोटा तरी तुझा **दास** ॥ ४ ॥

## ४५४.

पंडित वैदिक अथवा दशग्रंथी । सरी न पावती तुकयाची ॥१॥ शास्त्रेंही पुराणें गीता नित्य नेम । वाचितां तें वर्म न कळे तयां ॥२॥ मागें कवीश्वर झाले थोर थोर । कोणी कलेवर नेलें सांगा ॥ ३ ॥ ह्मणे **रामेश्वर** सकळिकां पुसोनी । गेला तो विमानीं बैसोनियां ॥४॥

## ४५५.

हरी मजला नको सोडूं । दुजे पांगी लागीं पाडूं ॥ १ ॥ निज भक्तांचा वेव्हार । देउनि लावीं आपलें वेड ॥ २ ॥ तुझें नित्य

मरण गोड । काय म्हणोनियां सोडूं ॥ ३ ॥ **सोहिरा** ह्मणे निज हें ताडूं । निरसुनि निजीं निजसुख जोडूं ॥ ४ ॥

४५६.

व्याघ्राचे जाळींत बांधोनियां गाय । पाहतोसी काय कृपावंता ॥१॥ लांडग्यासी तान्हें वासरूं निरविलें । पारणें करविलें त्याचे हातीं ॥२॥ हिंसकासी शेळी पोसणी त्वां दिली । त्यानें पुरती केली गती तिची ॥ ५ ॥ जीवनावेगळा तळमळी मीन । बगळ्या आधीन केला जैसा ॥ ४ ॥ मांजराच्या पुढें टाकोनी मूषक । पाहसी कौतुक दुरोनियां ॥ ५ ॥ पहिल्यापासून तुझा स्वभाव निश्चळ । परदुःख शीतळ कृपावंता ॥ ६ ॥ **मध्वनाथ** म्हणे न कळे तुझी मात्र । येउनि खाती लांव लेंकुरासी ॥ ७ ॥

४५७.

उखळ श्रवणाचें करुनी । मुसळ गुरुवचन धरुनी ॥१॥ कांडून सडूं शास्त्राच्या साळी । असार कोंडा वर साळी ॥ २ ॥ अनुभव तांदूळ निवडिले । मन सूपीं पाखडिले ॥३॥ चिद्घन साक्षात्काराचें । **उद्धव** विधि अविकाराचें ॥ ४ ॥

४५८.

साधनाचें सार गुह्याचें भांडर । राम निरंतर गात जावा ॥ १ ॥ नामावीण थोर आणिक नसे कांहीं । त्रैलोक्य हें पाहीं धुंडाळितां ॥ २ ॥ जप तप कोण कावाड वाहे ओझें । रामनाम गुज धरा वेगीं ॥ ३ ॥ **मुद्गल** ह्मणे करा आपुलें स्वहित । नामावीण मुक्त नाहीं नाहीं ॥ ४ ॥

## ४५९.

न करी स्मरण त्याचें गाढवपण । जळो तें श्रवण मननाविणें ॥ १ ॥
श्रवण करावें स्मरणीं आदरावें । मननीं राखावें निजध्यासा ॥ २ ॥
निजध्यासीं होय सहजीं साक्षात्कार । तुटे येरझार जन्मखेपा ॥ ३ ॥
**देवनाथ** म्हणे स्मरणाचें फळ । अभागी केवळ नेणे मूर्ख ॥ ४ ॥

## ४६०.

स्मरण करितां रामनाम ध्वनी । ऐकतांचि कर्णीं पळे यम ॥ १ ॥
नामपाठ करी रामकृष्ण हरी । होतील कामारी ऋद्धिसिद्धि ॥ २ ॥
साध्य तेंचि साधी न करी उपाधी । जन्मांतरिंच्या व्याधी हरती नामें ॥ ३ ॥ **नामा** म्हणे सर्व राम हाचि भाव । नाहीं आणिक देव रामेंवीण ॥ ४ ॥

## ४६१.

आपुली पदवी सेवकांसी द्यावी । तो एक गोसावी पांडुरंग ॥ १ ॥
भावाचा आळुका भुलला भक्तिसुखा । सांपडला फुका नामासाठीं ॥ २ ॥
प्रेमाचा जिव्हाळा नामाची आवडी । क्षण एक न सोडी संग त्याचा ॥ ३ ॥
**नामा** म्हणे आम्हा दीनांचें माहेर । तो एक उदार पांडुरंग ॥ ४ ॥

## ४६२.

पंढरीस जावें जीवन्मुक्त व्हावें । केशवा भेटावें जिवलगा ॥ १ ॥
काया वाचा मन चरणीं ठेवावें । प्रेमसुख घ्यावें सर्व काळ ॥ २ ॥
सुखाचें साजिरें श्रीमुख पहावें । जीवें उतरावें निंबलोण ॥ ३ ॥
बाहेर भीतरीं कैवल्य आघवें । वाचे न बोलवे ब्रह्मानंदु ॥ ४ ॥
चिरंजीव **नामा** कंठीं धरी प्राण । करी तुझें ध्यान रात्रंदिन ॥ ५ ॥

४६३.

देह जावो अथवा राहो । पांडुरंगीं दृढ भावो ॥ १ ॥ चरण न सोडीं सर्वथा । आण तुझी पंढरीनाथा ॥ २ ॥ वदनीं तुझें मंगळ नाम । हृदयीं अखंडित प्रेम ॥ ३ ॥ **नामा** म्हणे केशवराजा । केला पण चालविं माझा ॥ ४ ॥

४६४.

तूं माझी माउली मी वो तुझा तान्हा । पाजीं प्रेमपान्हा पांडुरंगे ॥ १ ॥ तूं माझी माउली मी तुझें वांसरू । नको पान्हा चोरूं पांडुरंगे ॥२॥ तूं माझी हरिणी मी तुझें पाडस । तोडीं भवपाश पांडुरंगे ॥ ३ ॥ तूं माझी पक्षिणी मी तुझें अंडज । चारा घालीं मज पांडुरंगे ॥ ४ ॥ **नामा** म्हणे होशी भक्तीचा वल्लभ । मागें पुढें उभा सांभाळिसी ॥ ५ ॥

४६५.

काय गुण दोष माझे विचारिसी । आहें मी तों राशी अपराधांची ॥ १ ॥ अंगुष्ठापासोनी मस्तकापर्यंत । अखंड दुश्चित आचरलों ॥२॥ स्वप्नीं देवा तुझी नाहीं घडली भक्ती । पुससी विरक्ति कोठोनियां ॥३॥ तूंचि माझा गुरु तूंचि तारीं स्वामी । सकळ अंतर्यामीं गाऊं तुज ॥४॥ **नामा** म्हणे माझें चुकवीं जन्ममरण । नको करूं शीण पांडुरंगा ॥५॥

४६६.

राम गावा राम ध्यावा । राम जीवींचा विसावा ॥ १ ॥ कल्याणाचें जें कल्याण । रघुरायाचें गुणगान ॥ २ ॥ मंगळाचें जें मंगळ । राम कौसल्येचा बाळ ॥ ३ ॥ राम कैवल्याचा दानी । **रामदासा** अभिमानी ॥ ४ ॥

## ४६७.

आकल्प आयुष्य व्हावें तया कुळा । माझियां सकळां हरिच्या दासां ॥१॥ कल्पनेची बाधा न हो कोणे काळीं । ही संत मंडळी सुखी असो ॥ २ ॥ अहंकाराचा वारा न लागो राजसा । माझ्या विष्णुदासां भाविकांसी ॥ ३ ॥ नामा म्हणे तयां असावें कल्याण । ज्या मुखीं निधान पांडुरंग ॥ ४ ॥

## ४६८.

प्रातःकाळ जाल्या राम आठवावा । हृदयीं धरावा क्षण येक॥१॥ क्षण एक राम हृदयीं धरीजे । संसारीं तरीजे हेळामात्रें ॥ २॥ हेळा-मात्रें रामनामें होये गती । भाग्यवंत घेती सर्वकाळ ॥ ३ ॥ सर्वकाळ राम मानसीं धरावा । वाचे उच्चारावा नामघोष ॥ ४ ॥ नामघोष वाचे श्रवण कीर्तन । चरणीं गमन देवालया ॥ ५ ॥ देवालया जातां सार्थक जाहालें । कारणीं लागलें कळीवर ॥ ६ ॥ कळीवर त्वचा जोडुनी हस्तक । ठेवावा मस्तक रामपायीं ॥ ७ ॥ रामपायीं सीळा झाली दिव्य बाळा । तैसाचि सोहळा मानवांसी ॥ ८ ॥ मानवांसी अंतीं रामनामें गती । सांगे उमापती महादेव ॥ ९ ॥ महादेव सांगे जप पार्वतीस । तोची तो विश्वास रामदासीं ॥१०॥

## ४६९.

धन्य त्याचें कुळ धन्य त्याचा वंश । जे कुळीं हरिदास अवत-रला ॥ १ ॥ धन्य ते जननी धन्य तिची कुसी । जे हरिप्रियासी प्रसवली ॥ २ ॥ धन्य ते समंधी संतांचे सोईरे । संसर्गे उधरे कुळ त्यांचें ॥ ३ ॥ धन्य तो पैं ग्राम धन्य तो पैं देश । जेथें रहिवास वैष्णवांचा ॥ ४॥ धन्य त्यांचे सखे वैष्णवी सर्वदा । ते सर्व गोविंदा

जिवलग ॥ ५ ॥ धन्य ते भाविक वंदिती हरिदास । तयां हृषीकेश वंदीतसे ॥ ६ ॥ धन्य ते निंदक निंदिती सज्जन । येणें भावें ध्यान घडे त्यांचें ॥ ७ ॥ धन्य दास दासी सज्जनसेवेसी । ते सुरवरांसी वंद्य होती ॥८॥ धन्य पशु श्वान वैष्णवां गृहींचे । कळिकाळ त्यांचे पाय वंदी ॥ ९ ॥ **रामदास** म्हणे तरीच धन्य होणें । जरी संग लाधणें सज्जनाचा ॥ १० ॥

## ४७०.

नाम घेतां रामरूप ठायीं पडे । गुज तें सांपडे योगियांचें ॥ १ ॥ योगियांचें गुज सर्वांठायीं असे । परी तें न दिसे ज्ञानेंविण ॥ २ ॥ ज्ञानेंविण योग ज्ञानेंविण याग । ज्ञानेंविण त्याग वाउगाचि ॥ ३ ॥ वाउगाचि धर्म वाउगेंचि कर्म । गर्भगीता वर्म बोलियेली ॥ ४ ॥ बोलीयली वर्म ज्ञान हें सार्थक । येर निरर्थक सर्व धर्म ॥ ५ ॥ सर्व धर्म त्यागीं मज शरण येईं । अष्ट दशोध्यायीं बोलियेले ॥६॥ बोलियेलें ज्ञान आगमीं निगमीं । ज्ञानेंवीण उर्मी निरसेना ॥७॥ निरसेना उर्मी आत्मज्ञानेंवीण । ज्ञानाचें लक्षण निरूपण ॥८॥ निरूपणीं ज्ञान अंतरीं प्रकाशे । विवेकें निरसे मायाजाळ ॥९॥ मायाजाळीं जन आत्मज्ञानी जाले । **दास** म्हणे गेले सुटोनियां ॥ १० ॥

## ४७१.

ऐसें आत्मज्ञान उधरी जगासी । पाहेना तयासी काय करूं ॥ १ ॥ काय करूं जना जन विवरेना । नेणतां सरेना जन्म मृत्य ॥ २ ॥ जन्म मृत्य बाधी मानीना तयासी । कल्पतरू ज्यासी तुछे वाटे ॥३॥ तुछे वाटे देव तोची तो निर्देव । तयासी सदैव कोण करी ॥ ४ ॥

कोण करी येका राघवावांचूनी । राम धरा मनीं सर्व काळ ॥ ५ ॥ सर्व काळ गेला दरिद्र भोगितां । वैराग्य पाहतां तेथें नाहीं ॥ ६ ॥ नाहीं भक्तिज्ञान परमार्थाचें सुख । संसारींही दुःख दरिद्राचें ॥ ७ ॥ दरिद्राचें दुःख केलें देशधडी । रामराज्य गुढी उभविली ॥ ८ ॥ उभविली गुढी भक्तिपंथें जावें । सीघ्रची पावावें समाधान ॥ ९ ॥ समाधान रामी **रामदासीं** जालें । सार्थकानें केलें सार्थकची ॥ १० ॥

## ४७२.

संसारीं या जन जन्मोनी मरती ॥ कोणी न स्थिरती देहाकारें ॥१॥ प्रत्यक्ष अवतार रामकृष्णादिक ॥ तेही गेले देख कायात्यागें ॥ २ ॥ गेले परी उरले लीलाधारें जनीं ॥ तरती भजनीं जन त्यांच्या ॥ ३ ॥ तरती ते ऐसे देहा विसरती ॥ देहातीत होती लक्षभारें ॥ ४ ॥ देह तो न राहे शाश्वत कोणाचा ॥ परी मरणाचा दर नाहीं ॥ ५ ॥ **अनंत** हरीच्या भक्तिभावें फळ ॥ नुरे तळमळ संसाराची ॥ ६ ॥

## ४७३.

बुद्धि ते जाणावी निश्चयाची वृत्ती । प्रियादिक स्थिती अहंकार ॥१॥ अहंकार तोचि प्रिय द्वेष्य मज । उपेक्ष्य सहज त्रिधारूपें ॥ २ ॥ त्रिधा अहंकार जो कां बुद्धीसह । मी मी म्हणे देह ऐसी वृत्ति ॥ ३ ॥ मी मी ऐशी वृत्ती वाचा हे वैखरी । जाग्रती ते वरी अभ्यासावी ॥ ४ ॥ अभ्यासावा पुढें स्वप्नींचा तो भास । म्हणे **हंसदास** सावधान ॥ ५ ॥

## ४७४.

माझे मुक्ताई मुक्ताई । लक्ष असे तुझे पाईं ॥ १ ॥ उचलुनि कडिये घेसी । सत्रावीचें स्तन मज देसी ॥ २ ॥ अनुहात-खुळखुळा

वाजे । नादें सर्वहि अंबर गाजे ॥ ३ ॥ नरहरि निष्ठुर माये । महीपतिलागीं दाखविं पाये ॥ ४ ॥

४७५.

सदा संतांपाशीं जावें । त्यांचे जवळी बैसावें ॥ १ ॥ उपदेश ते न देती । तरी ऐकाव्या त्या गोष्टी ॥ २ ॥ तेचि उपदेश होती । त्यांहीं कष्ट नष्ट होती ॥ ३ ॥ वासुदेव म्हणे संत । संगें करिती पसंत ॥ ४ ॥

४७६.

सत्वरज तम गेलें निरसोनी । दृश्याची लावणी कैसी झाली ॥ १ ॥ गेली गा माझारी पाहतां न दिसे । स्वयें तें प्रकाशें सदोदित ॥ २ ॥ आंत बाहेरीही पाहतांचि जरी । शून्याची ओंवरी ग्रासियेली ॥ ३ ॥

४७७.

वस्त्रा आड नग्न काष्टा आड अग्न ॥ द्वैता आड निर्गुण देखिलें भावें ॥ १ ॥ जंव मृत्तिका ठायीं तंव भिंती पैं नाहीं ॥ कर्तव्याचे पायीं द्वैत जालें ॥ २ ॥ जैसी लोहाची जंग तैसें द्वैत सोंग ॥ कल्पनेचा ढीग विषयरूप ॥ ३ ॥ द्वैत अद्वैत गोळा रविरश्मि कळा ॥ करितां निर्वाळा माझाचि मज ॥ ४ ॥ भजक भजन दिसे भासे एक ॥ महमदीं शेख एकमेकत्वें ॥ ५ ॥

४७८.

तीर्था जाती देखोवेखीं ॥ तेथें कैसी होत पाखी ॥ १ ॥ पाप गेलें पुण्य जालें ॥ प्रत्ययासी कैसें आलें ॥ २ ॥ ह्मणती जाऊं वैकुंठासी ॥ कैसें येतें प्रत्ययासी ॥ ३ ॥ देविदास म्हणे हित ॥ कैसे जाहलें स्वहित ॥ ४ ॥

४७९.

मी तुझ्या पायींचा रज ऐसा मावीं ॥ तूं आमुचा गोसावी देवराया ॥ १ ॥ गोविंदा तूं गाय मी वत्स निर्धारें ॥ तूं माय म्यां पोरें आळकीजे ॥ २ ॥ गोविंदा तूं पती आह्मीं पतिव्रता ॥ गोविंदा तूं पिता पुत्र आह्मी ॥ ३ ॥ गोविंदा तूं सिंधु आम्हीं सर्व गंगा ॥ असों सर्व अंगा आलिंगुनीं ॥ ४ ॥ गोविंदा तूं आत्मा आम्ही आत्मस्थिति ॥ तूं रत्न मी दीप्ति गोपिनाथा ॥ ५ ॥ तुम्हीं दयार्णव आम्हीं तेथें दया ॥ असों सोयरीया अभिन्नत्वें ॥ ६ ॥

